# तिसरा जांवई

सामाजिक सुखान्त नाटक



म. रं. शिरवाडकर



कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २

नोव्हेंबर १९५२

किंमत २ रुपये

जळगांव येथील विकास मंडळासाठीं मी हें नाटक लिहिलें. विकास मंडळातर्फेंच हें नाटक रंगभूमीवर आले, याबद्दल मंडळाचा मी अतिशय ऋणी आहे. हें नाटक लिहितांना मला अनेक मित्रांच सहाय्य झालें. अनेक मित्रांच्या मदतीमुळेंच हें नाटक रंगभूमीवर आलें. विशेषतः माझे मित्र श्री. ग. बा. पाठक श्री. दि. खानवाले, श्री. रा. गो. पोंक्षे आणि श्री. बाळासाहेब नांदुर्डीकर यांनीं या नाटकासाठीं अतिशय श्रम घेतले. ह्या सर्वांचे आणि पहिल्या प्रयोगांत काम करणाऱ्या नटवर्गांचे मी कृतज्ञतापूर्वक आभार मानतो.

म. रं. शिरवाडकर

## : १ :

### प्रवेश पहिला

[ बाबासाहेबांचा दिवाणखाना. बाबासाहेब आणि भाऊसाहेब चहापान करीत आहेत. ]

**बाबासाहेब** : भाऊसाहेब ! आज आपली अशी अचानक भेट झाल्यामुळं मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं ! लवकरच आपण दोघं व्याही होणार ! माझ्या मुलींना मी आजपर्यंत फुलांसारखं वागवलं. मुलीशिवाय मला घटकाभरसुद्धा करमत नाहीं.पण किती झालं तरी मुली म्हणजे परक्याचं धन म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं ! चिमण्यांप्रमाणं मुलीहि एक दिवस घराबाहेर उडून जातात ! मुलीला चांगलं घर मिळावं, तिचं जीवन सुखानं, समृद्धीनं बहरलेलं असावं, या पलीकडे मुलीच्या बापाची तरी इच्छा काय असणार ? आणि या बाबतींत मी खरोखरच फार भाग्यवान् आहें. मी जुन्या संस्कारांत वाढलों असलों तरी नवीन गोष्टींचा शत्रू नाहीं ! नवीनतेचा प्रचंड प्रवाह थोपवूं म्हटलं, तरी थोपविला जात नाहीं. मग असा हास्यास्पद प्रयत्न कराच कशाला ? तो प्रवाह योग्य मार्गानं, योग्य दिशेनं चालला आहे एवढं पाहिलं म्हणजे पुरें ! मी माझ्या मुलींना शिकवलं, सुविद्य केलं, त्यांना स्वातंत्र्य दिलं.

त्यांनी आपापले भावी पति निश्चित केले. शिक्षण दिल्यानं, स्वातंत्र्य दिल्यानं माझ्या मुली बिघडतील असं मला कधीच वाटलं नाहीं. हंसीला कितीहि स्वातंत्र्य दिलं तरी ती शेवटीं हंसाचीच निवड करणार! आमच्या उषानं तुमच्या अशोकशीं लग्न करायचं ठरवलं. दोघांचीं मतं जमलीं, मनं जुळलीं—आणखी काय हवं? माझ्या दुसऱ्या मुलीनं निशेनं, नरेशांशीं लग्न करायचं ठरवलं आहे. तोहि मुलगा तुमच्या अशोकसारखाच प्रेमळ आहे. नरेशांच्या वडिलांची परवाच मीं गांठ घेतली. आज तुमच्या भेटीचा सुयोग आला. खरंच, आमची उषा फार भाग्याची म्हणून ती तुमच्या घरांत जाते आहे!

**भाऊसाहेब :** भाग्यवान कोणी असेल तर अशोक आणि मी! बाबासाहेब, तुमच्यासारख्यांचा संबंध यायला पूर्वजन्माची पुण्याईच पाहिजे यांत शंका नाहीं! परवा जेव्हां पत्र लिहून अशोकनं आपली निवड मला कळविली, तेव्हां माझा आनन्द गगनांत मावेनासा झाला. बाबासाहेब, आपली सुविद्य कन्या माझी सून होणार यापेक्षां अधिक आनंदाची गोष्ट कोणची असूं शकेल? आतां आपण लवकरच लग्नाचा मुहूर्त ठरवावा हें बरं!

**बाबासाहेब :** माझंहि तेंच मत होतं आणि आहे! पण माझ्या मुली आहेत जरा हट्टी! त्या म्हणतात कीं आमचं आणि सुशीचं लग्न बरोबर झालं पाहिजे!

**भाऊसाहेब :** सुशीला कोण?

**बाबासाहेब :** सुशीला माझी पुतणी! माझ्या दोन मुलींप्रमाणं तीहि माझ्याजवळच ल्हानाची मोठी झाली. माझ्या मुलींना आई नाहीं, पण सुशिलेला आई नाहीं आणि बापहि नाहीं. सुशी पुतणी खरी पण तिचा सांभाळ मीं अगदी माझ्या मुलींसारखा केला. आमची सुशी आहे लाजरी आणि संकोची! ती स्वतःचं लग्न स्वतः ठरवील असा बिलकुल संभव नाहीं. म्हणून आतां एखादं चांगलसं स्थळ पहातों आहें मी तिच्यासाठीं. तें जमलं कीं तिघींचें विवाह एकाच मुहूर्तावर उरकून टाकायचा माझा विचार आहे. वास्तविक उषाचा आणि निशेचा विवाह आतां करायला हरकत नाहीं. पण त्यांनीं

हट्ट धरला आहे कीं सुशीचं लग्नहि त्याच वेळीं झालं पाहिजे. वेड्या मुली अन् त्यांचे हट्टहि वेडे! पण ते हट्ट पुरविण्यांतहि एक प्रकारचं सुख असतं नाहीं?

**भाऊसाहेब** : आणि त्यांत वावगं तरी काय आहे? अशोकच्या लग्नाची तर बिलकुल घाई नाहीं. मुलींच्या मनासारखं होऊं द्या!

**बाबासाहेब** : आपला मी खरोखरच फार आभारी आहें. नरेशांच्या वडिलांनीहि ह्या गोष्टीला संमति दिली आहे. आणि खरं सांगूं कां, मुलींच्या हट्टाला माझाहि पाठिंबा आहे बरं का! त्या निमित्तानं का होईना, मुली माझ्याजवळ आणखी कांहीं काळ राहतील! (दोघेहि हंसतात) पण ह्या आज गेल्या तरी कुठें? आज अगदी सामसूम दिसत आहे! दररोज बोलून बोलून अगदी डोकं उठवतात आणि आज अगदी चूप बसल्या आहेत घरांत! (आंतील दरवाजाजवळ जाऊन) उषा, निशा, सुशे,! अग, इकडे या! घरांत काय करीत बसल्या आहांत एवढ्या! (उषा, निशा आणि सुशीला प्रवेश करतात) भाऊसाहेब, ही आपली भावी सून उषा! अग, एवढं लाजायला नको! (प्रथम उषा आणि नंतर निशा व सुशीला भाऊसाहेबांना नमस्कार करतात) ही माझी दुसरी मुलगी निशा, उषापेक्षां दोन वर्षांनीं लहान आणि ही माझी पुतणी सुशी, निशेच्याच वयाची आहे. भाऊसाहेब, माझ्या ह्या सगळ्या मुली फार छान गाणं म्हणतात बरं का! आतां आम्हांला तर गाण्यांत कांहीं समजत नाहीं, पण ज्यांना समजतं ते सुद्धा ह्यांच्या गाण्याची फार तारीफ करतात. मुलींनो! दाखवा बरं एखादं गाणं गाऊन पाव्हण्यांना! हं चला आटपा– लाजूं नका!

(तिघी गाणं म्हणतात.)

**भाऊसाहेब** : फारच छान! बाबासाहेब, अशा सुविद्य आणि प्रेमळ मुली ज्या घरांत जातील, ती घरं मंगलतेनं उजळून निघतील यांत काय संशय? बाबासाहेब, लग्नाचा मुहूर्त ठरवा आणि मला पत्र टाका. म्हणजे मी लगेच येतों. (घड्याळाकडे पाहून) गाडीची वेळ झाली. तिकडे अशोक माझी वाट पहात असेल. मग घेऊं रजा मी? मुलींनो! येतो बरं कां! आतां लाडू

खायलाच येऊं एकदम!

**बाबासाहेब :** चला मीहि स्टेशनवर येतों! सुशे, माझी काठी घे बरं!

[ सुशीला काठी आणून देते. बाबासाहेब व भाऊसाहेब जातात. ]

**निशा :** कसं झालं ग गाणं आपलं?

**उषा :** छान — फारच छान!

**सुशीला :** छान म्हणे! तुझं लक्ष तरी होतं कां गाणं म्हणण्याकडे? लाजून लाजून लाल झाली होतीस गाजरासारखी!

**उषा :** तुझ्यावर सुद्धा असा प्रसंग लवकर येईल बरं! इतका हेवा वाटायला नको कांहीं!

**निशा :** तिच्यावर तो प्रसंग यायला अजून अवकाश आहे. त्यापूर्वी तिला एका खडतर प्रसंगाला तोंड द्यावं लागेल.

**सुशीला :** कुठल्या ग?

**निशा :** वधूपरीक्षेच्या! फार वाईट बरं सुशे!

**उषा :** वधूपरीक्षेच्या वेळीं तूं सुशीच्या शेजारीं बैस म्हणजे झालं! बरं का सुशे! ही निशा शेजारीं असली म्हणजे भय बाळगायचं कांऽहीं कारण नाहीं तुला!

**निशा :** ( हंसून ) सुशे! हा हिचा स्वतःचा अनुभव आहे बरं कां!

**सुशीला :** ( आश्चर्यानें ) स्वतःचा अनुभव? तिला कधीं कोणाला दाखवलं होतं? तिचा तर प्रेमविवाह ठरला आहे अशोकांशीं!

**निशा :** अग, प्रेमविवाह ठरण्याआधींची गोष्ट आहे. तूं नागपूरला गेली होतीस त्या वेळीं! एका मित्राच्या अत्याग्रहामुळें बाबांनी एका विवाहेच्छू तरुणाला उषेला दाखवायचं कबूल केलं. आले बाई ते गृहस्थ उषला बघायला! आणि उषेला पहिला प्रश्न त्यांनीं काय विचारला आहे ठाऊक?

**सुशीला :** काय?

**निशा** : ( साभिनय ) ते म्हणाले · मुली ! बुडापेस्ट शहर कोणच्या देशांत आहे बरं ? त्यावर मीं त्यांना म्हटलं – महाराज ही वधूपरीक्षा आहे कीं भूगोलाची परीक्षा आहे – म्हणजे तशी तयारी करायला बरं ! सुशे, राजश्री इतके गोंधळून गेले कीं, पांच मिनिटांतच पळून जावं लागलं त्यांना तेथून !

**उषा** : तात्पर्य काय कीं तूं तुझ्या परीक्षेच्या वेळीं निशेला बरोबर ठेव.

**निशा** : खरंच, आजकाल सगळी मंडळी सुशीसाठीं स्थळ शोधण्यांत दंग झाली आहेत. सुशे, तुला नवरा कसा हवा ग ? रोमिओसारखा स्वप्नाळू हवा कीं राणा प्रतापसारखा समशेरबहाद्दर हवा ? कीं तुकारामासारखा संत हवा ?

**उषा** : नको ग बाई तसा नवरा आमच्या सुशीला ! सुशे, तूं जरा बोल कीं ! अग, लग्नाच्या बाबतींत माणसानं कसं मनमोकळं असावं ! जन्माच्या गांठीचा हा प्रश्न असतो बरं !

**सुशीला** : बरं हं आजीबाई ! आपल्या जन्माची गांठ इकडे येते आहे, ती बघा म्हटलं आधी !

**निशा** : अगबाई !अशोक ! चल सुशे आपण जाऊं आपल्या !

[ निशा व सुशिला जातात. अशोक प्रवेश करतो ]

**उषा** : ( लटक्या रागानें ) किती वाट बघायची माणसानं ! लग्नापूर्वीच जर ही गत, मग लग्नानंतर तर कांहीं विचारायलाच नको !

**अशोक** : लग्न म्हणजे पुरुषाच्या स्वातंत्र्याची समाप्ति ! म्हणून लग्नपूर्व काळांत प्रत्येक पुरुषानं मनमुराद स्वातंत्र्य उपभोगून घेतलं पाहिजे. माझ्या स्वातंत्र्याचे दिवस आतां अगदींच थोडे राहिले आहेत. तेव्हां त्या स्वातंत्र्याचा भरपूर उपयोग करून घ्यायला नको कां ?

**उषा** : ( लटक्या रागानें ) असं जर आहे तर कशाला लग्नाची आपत्ति ओढवून घेतां स्वतःवर ?

**अशोक** : ( हंसत ) लग्न ही अशी आपत्ति आहे की जी स्वतःवर कधीं ओढवेल याची प्रत्येक मनुष्य अधिरतेनें वाट बघत असतो ! पण हें काय ! तूं

खरंच रागावलीस माझ्यावर? म्हटलं, बाईसाहेब, आमच्या पिताजींना पोंचविण्यासाठीं स्टेशनवर जायचं होतं. म्हणून थोडासा उशीर झाला. आतां तरी क्षमा करणार ना?

**उषा** : केली! पण एका अटविर!

**अशोक** : कुठली ती अट बुवा?

**उषा** : पुन्हां असा उशीर कधी करायचा नाहीं!

**अशोक** : उलटा न्याय आहे हा! उशीर तुझ्याकडूनच होत आहे, माझ्याकडून नव्हे!

**उषा** : तो कसा बाई?

**अशोक** : लग्न ताबडतोब उरकून टाकायचं असं मी म्हणत असतां तुझं आपलं थांबा – थांबा हें तुणतुणं चालू आहे. खरं म्हणजे मीच तुझ्यावर रागवायला पाहिजे!

**उषा** : अंहं! असं रागवायचं नाहीं! सुशीचं लग्न एकदां ठरलं म्हणजे ताबडतोब लग्न करूं आपण. कांहीं झालं तरी सुशी, निशा आणि मी एकदमच सौभाग्यवती झालों पाहिजे. नरेशांनीं सुद्धां मान्यता दिली आहे ह्याला. तुम्ही सुद्धा माझा एवढा हट्ट पुरवावा – पुरविणार ना?

**अशोक** : न पुरवून सांगतों कोणाला? लहान मुलांचे हट्ट एखादी थप्पड देऊन बंद करतां येतात. पण बायकांच्या हट्टाच्या बाबतींत आजकाल तीहि सोय राहिली नाहीं! पूर्वींचे पुरुष त्या बाबतींत फार सुखी होते!

**उषा** : पुरें झालं बाई हें बोलणं! सुशीसाठीं स्थळ शोधून काढणार होता तें काढलंत कां?

**अशोक** : तेंच तर सांगणार आहे तुला मी! हें बघ, माझा एक मित्र आहे विनायक म्हणून. खूप हुशार आहे, प्रेमळ आहे, दिलदार आहे, थोडासा विचित्र आहे, पण लग्न झालं कीं येईल आपोआप ठिकाणावर! बाबासाहेबांना भेटून विनायक-सुशीची मुलाखत घडवून आणावी म्हणतों.

**उषा :** खरंच, अगदी लवकर करा काय तें! सुशीचं लग्न आतां फार वेळ लांबणीवर टाकण्यांत अर्थ नाहीं.

**अशोक :** हो, बरोबर आहे. कारण त्यामुळं तुझं लग्नहि लांबणीवर पडलं आहे!

**उषा :** इश्श! असं नाहीं! माझं लग्न तर काय ठरलेलंच आहे! तुमच्या मधुर सहवासांत माझा काळ किती सुखांत चालला आहे! आतां एकदां सुशी त्या मार्गाला लागली कीं माझ्या सुखाला पारावार रहाणार नाहीं. मग गडे आपण दोघंहि आतांच बाबांना भेटूं! ( बाहेर पाहून ) ओ हो! आमचे भावी मेव्हणे येताहेत! यावं महाराज! ( नरेश प्रवेश करतो ) निशा–अग निशे, बाहेर कोण आलं आहे बघ तरी! ( निशा प्रवेश करते ) चला अशोक, आपण आपली अडगळ येथून हलवूं आतां!

**निशा :** दोघांना बाहेर पडायला हें बरं निमित्त मिळालं!

**उषा :** ( जातांना ) पण म्हटलं बाईसाहेब, हें निमित्त सुद्धा आपल्या पथ्यावरच पडलं आहे.

[ अशोक व उषा जातात ]

**नरेश :** निशे, मी आज फार आनंदांत आहे–अतिशय आनंदांत!

**निशा :** एवढं काय झालं बाई आनंद व्हायला?

**नरेश :** ओळख बरं तूंच!

**निशा :** अं ऽ ऽ ओळखतें हं! आज तुम्ही ऑफिसमध्ये अगदीं वेळेवर गेलां असाल म्हणून चकित होऊन तुमच्या साहेबांनीं तुम्हाला सोन्याचं पदक दिलं असेल नाहीं? हं! हं! ओळखलं! तुम्ही आज घरांत सिनेमाचीं गाणीं मोठ्यानं म्हटलीं नसतील म्हणून वाड्यांतील सर्व लोकांनीं तुम्हाला एक मानपत्र अर्पण केलं असेल किंवा—

**नरेश :** पुरे कर निशा! माझी बदनामी करायचा तूं अगदी विडा उचललेला दिसतोस. मी आनंदांत कां याचं कारण सांगतां येत नाहीं असं सरळ सांग कीं!

**निशा :** बरं तसं म्हणा ! सांगा बघूं काय कारण तें !

**नरेश :** आतां आपलं लग्न लवकरच होणार ! सुशीलाताईसाठीं मीं एक स्थळ पाहिलं आहे.

**निशा :** खरंच ? कुठलं ?

**नरेश :** तें नाहीं सांगणार सध्या ! बाबासाहेबांजवळच गोष्टी काढणार आहें मी आज. तुला एवढंच सांगतों कीं स्थळ फार उत्तम आहे. आतां तर आपलं लग्न व्हायला कांहीं आडकाठी उरली नाहीं ना ? तूं कधी माझी होशील असं झालं आहे मला निशा ! पण हें बघ निशा, एका बाबतींत तुझी मदत मला हवी आहे !

**निशा :** सांगा !

**नरेश :** ज्या गृहस्थाचं स्थळ मी सुशीलाताईसाठीं सुचविणार आहें त्यांचं नांव आहे दिवाकर. दिवाकरांची खूप स्तुति करून तूं सुशीलाताईचं मन त्यांच्या बाजूनं तयार कर. इतकं कीं सुशीलाताईनीं दुसऱ्या कोणाशीं लग्न करायचं मनांत सुद्धा आणतां कामा नये. बस्स– एवढी कामगिरी तूं केलीच पाहिजेस !

**निशा :** पण हें तुमचं प्रेक्षणीय स्थळ मला एकदां नजरेखालीं घालूं द्या कीं ! मग त्या स्थळाची स्तुति करायची कीं निंदा करायची हें ठरवायला बरं ! भलत्या स्थळाचा गळ सुशीच्या मानेभोंवतीं मी लागूं देणार नाहीं हं !

**नरेश :** तूं त्या बाबतींत निर्धास्त रहा. मी आतां बाबासाहेबांना भेटून सगळ्यांच्या ओळखीपाळखी घडवून आणतों. अग, तुझ्या बहिणीसाठीं मी जें स्थळ शोधून काढलं आहे तें उत्तम असणारच. सुटलों बुवा एका मोठ्या जबाबदारीमधून. हिमालयासारखं ओझं खालीं उतरल्यासारखं वाटतं !

**निशा :** हिमालयासारखं ओझं ? अहो आमच्या सुशीसाठीं इतर स्थळंच काय पण खुद्द हिमालय पर्वत सुद्धां धांवत येईल !

**नरेश :** कबूल– पण म्हणूनच तिच्यासाठीं योग्य वर शोधून काढणं कठीण झालं होतं. शहाजहान बादशहाची कन्या इतकी रूपसंपन्न होती कीं योग्य

तो वर मिळणं कठीण झाल्यामुळं तिला अखेरपर्यंत अविवाहितच रहावं लागलं. फार सुंदर मुलीचं लग्न हा सुद्धां एक मोठा प्रश्न होऊन बसतो. आणि म्हणूनच सुशीलाताईंना योग्य वर सांपडल्यामुळं माझं मलाच धन्य वाटत आहे. मला वाटलं होतं कीं, ही बातमी ऐकल्याबरोबर तूं आनन्दानं नाचशील आणि माझी खूप स्तुति करशील. पण कसचं काय !

**निशा :** बरं बरं ! एवढं मनाला लावून घ्यायला नको ! ऐका हं– मी आतां तुमची स्तुति करतें ! ( नाटकी आवाजांत ) नरेश, तुमची कर्तबगारी महान आहे. अशी कर्तबगारी दाखविणारा पुरुष शतकांत एखादाच निपजतो; किंबहुना एखादाहि निपजत नाहीं असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल असं वाटत नाहीं. शिवाय असंही म्हणायला हरकत नाहीं कीं–

**नरेश :** ( हंसून ) पुरें, पुरें !

**निशा :** नरेश, खरं सांगू कां ? तुम्ही कर्तबगार असा– नसा, मला तुम्ही फार प्रिय आहांत. प्रेमांत पडलेल्या माणसाला फक्त प्रेम दिसतं. जिथं दुसरं कांहीं दिसतच नाहीं, तिथं कर्तबगारी असली काय किंवा नसली काय, सारखंच ! ( हंसते ) तुम्हाला राग येतो कां हो माझ्या अशा बोलण्याचा ?

**नरेश :** मुळींच नाहीं ! उलट तुझ्या अशा बोलण्यामुळेंच तर मला नेहमीं तुझ्याजवळ रहावसं वाटतं.

**निशा :** खरं – अगदी खरं ?

**नरेश :** अगदी खरं. चल आतां आपण बाबासाहेबांकडे जाऊं आणि दिवाकरांसंबंधीं त्यांच्याजवळ गोष्ट काढूं. पण मी सांगितलेलं लक्षांत आहे ना ?

**निशा :** हो ! आहे तर !

**नरेश :** काय ?

**निशा :** सुशीचं मन दिवाकरांविरुद्ध शक्य तितकं कलुषित करायचं !

**नरेश :** निशे, हा विनोद आतां पुरे झाला.विषयाचं गांभिर्य तुला कळणार तरी कधीं ? चल माझ्याबरोबर, आपण बाबासाहेबांची गांठ घेऊं !

( जातात. पडदा पडतो )

: प्रवेश दुसरा :

[ गांवापासून दूर असलेला एक बाग. अण्णा आणि विनायक प्रवेश करतात. ]

**अण्णा** : माझं नांव अण्णा कुलकर्णी ! तुम्हाला कधीं पाहिल्याचं मला स्मरत नाहीं. कोण तुम्ही ? कुठले तुम्ही ? नांव काय तुमचं ? तुम्ही मला ओळखतां ?

**विनायक** : पूर्वी तुम्हाला ओळखत नव्हतो मी—पण ह्या क्षणापासून ओळखायला लागलों आहे.

**अण्णा** : म्हणजे काय ?

**विनायक** : म्हणजे मी तुम्हाला प्रथमच बघतों आहे आज.

**अण्णा** : असं ? ओळख नसतांना तुम्ही एकदम कसे बुवा बोलायला लागलांत माझ्याशीं ! एकेक पहावं तें नवलच !

**विनायक** : असं कसं म्हणता तुम्ही अण्णा ! अहो, ओळख नाहीं म्हणून बोलायचं नाहीं हा न्याय कुठला ? अशानं तर जगांतले सर्वच लोक एकमेकांशीं अपरिचित राहतील. ओळख ही अशी गोष्ट आहे कीं जी केल्याशिवाय होत नाहीं. म्हणून मी तर ठरवलं आहे कीं कोणी भेटो, त्याच्याशीं बेधडक बोलायचंच ! ( काळजीच्या स्वरांत ) शिवाय मी सध्यां जरा नाजुक परिस्थितींत आहे. त्यामुळें इच्छा असो वा नसो, लोकांच्या ओळखी मला काढाव्या लागतात, त्यांचीं आर्जवं करावीं लागतात, त्यांच्या दाढ्या धराव्या लागतात ! कित्येकदा तर असं होतं कीं, एखादा मनुष्य महामूर्ख आहे, हें मला स्पष्ट दिसतं; तरी सुद्धां त्याची ओळख काढण्याशिवाय मला गत्यंतर राहत नाहीं ! अंहं ! रागावूं नका, अण्णा ! तुम्हांला नाहीं उद्देशून बोल्लो मी.

**अण्णा** : बरं, बरं ! पण तुम्ही कोण, कुठले, काय करतां, कुठल्या

नाजुक परिस्थितींत सांपडला आहांत? सगळं सांगा तर खरं ! बसा !
( दोघं बसतात. अण्णा चंची काढतात )

**विनायक** : माझं नांव विनायक महादेव देशपांडे. जगांत एकटा आहे हो मी अगदीं–अगदीं एकटा ! ( डोळे पुसण्याचा आविर्भाव करेतो ) घरचं 'बरं आहे–पण नोकरी नाहीं. पण नोकरीचं सोडा–नोकरीचं नाहीं विशेष वाटत मला. पण माझं दुःखं वेगळंच आहे स्पष्ट सांगतों–हो लाजायचं कुठंवर–अहो, माझं अद्याप लग्न व्हायचं आहे ! झालं आहे काय कीं, मुलीचा बाप म्हणून माझ्याकडे ढुंकून बघत नाहीं. मला तर आतां अशी शंका यायला लागली आहे कीं मुलींचे बाप हल्ली जगांत उरलेच नाहींत कीं काय ! कां ह्या लोकांनीं माझ्यावर बहिष्कार टाकला आहे, कांहीं समजत नाहीं. पुष्कळ लोक तक्रार करतात कीं, मुलींच्या बापांनीं आणि विमा–एजंटांनी भंडावलं आहे. मी म्हणतों, हे मुलींचे बाप मला कां बरं भंडावत नाहींत? माझ्याकडे फक्त विमा–एजंटच येतात. माझ्या लग्नाची ही अशी शोकांतिका झाली आहे. म्हणून तुमच्यासारख्यांची मदत पाहिजे आम्हांला ! दुसरं काय ! लग्न–लग्न–लग्न, केवढी जादू आहे ह्या शब्दांत नाहीं ?

**अण्णा** : जादू आहे तर ! जादू असल्याशिवाय कां मी तीन लग्नं केलीं ?

**विनायक** : तीन? फार भाग्यवान दिसतां तुम्ही !

**अण्णा** : हं ऽऽ ! परमेश्वराची. कृपा दुसरं काय ! योगायोगाच्या गोष्टी असतात ह्या सगळ्या ! माझीं तिनि लग्नं व्हावीत हा योगायोग आणि तीन लग्नं होऊनही ह्या वयांत बायकोशिवाय मला रहावं लागावं हाहि योगायोगच. प्राक्तनांत जें लिहिलं आहे तें चुकत नाहीं, हेंच खरं ! होणारे न चुकेल होइल जरी ब्रम्हा तया आडवा !

**विनायक** : ( जवळ सरकून ) पण कां हो, ज्याअर्थी तुम्ही तीन लग्नं केलींत, त्याअर्थी तुमच्या घरीं उपवर मुलीं असणारच, नाहीं? हं ! कसं ओळखलं मी ! जांवयाच्या शोधांत असणारच तुम्ही–कसं ओळखलं–द्या टाळी !

**अण्णा :** ( त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देतां चंचीत कांहींतरी शोधतो ) मला एकंदर मुली पांच !

**विनायक :** ( आनंदानं ) पांच ?

**अण्णा :** हो पांच !

**विनायक :** ( आणखी जवळ सरकून ) म्हणजे आज प्रत्यक्ष परमेश्वराशींच माझी गाठ पडली म्हणायची !

**अण्णा :** त्यापैकीं पाहिली दिली नाशिकला पोतदारांकडे, दुसरी दिली चिपळूणला हिंगण्यांकडे, तिसरी दिली शहाद्याला सावळयांकडे–( तोंडांत तंबाखू टाकतो. )

**विनायक :** ठीक ठीक ! म्हणजे, आतां दोघींचीं लग्नं व्हायचीं आहेत. असंच ना ?

**अण्णा :** चवथी दिली आहे खेडला खेडकरांकडे.

**विनायक :** ( ओरडून ) पांचवीचं तरी व्हायचं आहे न अजून ?

**अण्णा :** पांचवी दिली आहे पुण्याला पुरोहितांकडे !

**विनायक :** पांचवी सुद्धां दिलीत ? केवढी निराशा केलींत तुम्हीं माझी ! हिमालयाच्या गौरीशंकरावर तुम्ही मला चढवलंत आणि दुसऱ्या क्षणीं पाताळांत गाडलंत. माझ्या हृदयाच्या शतशः चिंधड्या उडवल्यात. निदान पांचवी तरी ठेवायची होती अण्णा !

**अण्णा :** एवढा निराश कां होतोस विनायक ! ह्या अण्णानं आजपर्यंत शेकडों लग्नं जमविलीं आहेत. ( तंबाखू मळीत ) हाताचा मळ आहे लग्न जमविणं माझ्या ! माझा पुतण्या बबन–तुझ्यासारखाच बेकार होता. लग्न कांहीं केल्या जमेना लेकाचं ! मी त्याला बोलावलं माझ्याकडे–सहा दिवसांत दोनदां लग्न !

**विनायक :** खरंच ? मग अण्णा, मला तुमचा बबन समजा, छगन समजा,

जगन समजा, कांहीं समजा. पण कांहीं करून मला एकदां बोहोल्यावर चढवा बुवा !

**अण्णा :** अवश्य ! एक दिवस ये माझ्याकडे. म्हणजे आपण ह्याचा सावकाश विचार करूं.

**विनायक :** एक दिवस कशाला ? उद्यांच तुमच्याकडे हजर आहे मी ! तुम्ही कुठें राहतां बरं ?

**अण्णा :** मी राहतो ढेकण्यांच्या वाड्यांत ! मारुतीच्या मंदिराजवळ दुमजली घर नाहीं कां ? हिरव्या रंगाचं ? हं तें !

**विनायक :** तुमच्या घरीं कोण कोण आहेत ?

**अण्णा :** कोणी नाहीं– मी आणि माझा नोकर. बरं आहे जातों मी आतां. माझ्या संध्येची वेळ झाली. ( उठतो ) मग उद्यां जरूर ये घरीं माझ्या !

**विनायक :** तुमचं तिसरं लग्न कधीं झालं ? म्हणजे कोणच्या सालीं झालं ?

**अण्णा :** ह्या नसत्या पंचायती करायच्या काय तुला ! वेडा कुठला ! बरं मग उद्या जरूर ये हं ! ( जातो )

**विनायक :** काय लोक आहेत हे ! ह्या गृहस्थाला पांच मुली असून त्यानं माझा कधींच तपास करूं नये अं ? ( आकाशाकडे दृष्टि वळवून ) हे दयाघन भगवंता ! माझा हा छळ कुठवर चालणार ? मगराच्या दाढेमधून तूं गजेंद्राची मुक्तता केलीस. ह्या लग्नपूर्व विरहव्यथेमधून तूं मला कधीं बरं बाहेर काढणार ? हे जगन्नायका, माझी फक्त एकच मागणी आहे – फक्त एकच ! मला लवकर – अगदीं लवकर बोहोल्यावर चढव. तूं बाळ ध्रुवाला आकाशांत, उंच जागीं चढवलंस. त्या मानानं मला बोहोल्यावर चढवणं, किती सोपं आहे बरं ! आहे ना सोपं ? मग आतां वेळ कां बरं ? ( अशोक येतो आणि विनायकाला हलवतो ) कोण ? अशोक ? तूं आहेस हो ! मला वाटलं, माझ्या प्रार्थनेनं प्रसन्न झालेल्या परमेश्वरानं एखाद्या मुलीचा बापच माझ्याकडे धाडला आहे ! अशोक, तूं मुलीचा बाप कां झाला नाहींस ?

**अशोक** : पुरें रे विनायक! तुझ्या घरीं जाऊन आलों मी. तुझा तिथं पत्ता नाहीं. म्हटलं स्वारी बहुधा बागेंत बसलेली असणार. (बोट दाखवून) आणि तो गृहस्थ कोण रे? कोणाशीं बोलत होतास तूं?

**विनायक** : अरे, तो गृहस्थ इकडे फिरायला आला होता. मला वाटलं–असेल बहुतेक उपवर मुलीचा बाप आणि करीत असेल स्थळाचा शोध. हल्ली पंचाईत हीच झाली आहे कीं उपवर मुलींचे बाप कोण आणि इतर निरुपयोगी लोक कोण, हेंच कळेनासं झालं आहे. त्यामुळं होतं काय, कीं प्रत्येक मनुष्याची मला दाढी धरावी लागते. आणि एवढं करून शेवटीं दाढीशिवाय हातीं कांहींच येत नाहीं! मोठ्या आशेनं त्या गृहस्थाशीं मी परिचय करून घेतला. सुरवात त्या गृहस्थानं फार सुंदर केली. पण शेवट मात्र अगदीच भयंकर केला. माझ्या नशिबांतच नाहीं तर त्याला कोण काय करणार?

**अशोक** : विनायक, हे मूर्खपणाचे प्रकार आतां पुरे कर. तुला कांहीं वेड-बीड लागलं आहे कां रे?

**विनायक** : हो! मला लग्नाचं वेड लागलं आहे खरं!

**अशोक** : लग्नाची इच्छा होणं ह्यांत अनैसर्गिक काहीं नाहीं. पण त्या इच्छेची पूर्तता करण्यासाठीं तूं जे मार्ग स्वीकारले आहेस ते अभिजात मूर्खपणाचे, आचरटपणाचे आहेत. कुणी भेटला कीं काढ त्याच्याजवळ लग्नाची गोष्ट! आहे तरी काय हें! परवां तूं मुंबईहून परत आलास, तेव्हा स्टेशनवरून तुझं सामान आणणाऱ्या हमालाजवळ सुद्धां तूं स्थळाची चौकशी करीत होतास!

**विनायक** : अरे, कसं कळत नाहीं तुला अशोक! ह्या हमाल मंडळींना सर्व लहान मोठ्या लोकांकडे जायचा प्रसंग येतो. त्यामुळं त्यांना स्थळांविषयीं माहिती असण्याचा संभव असतो, नाहीं असं नाहीं.

**अशोक** : पुरे झाला मूर्खपणा हा! हें बघ – तुला आतां एक आनंदाची बातमी सांगायची आहे.

**विनायक** : मित्रा, माझी मनःस्थिती सध्या अशी झाली आहे कीं, कोण-

च्याही बातमीनें मला आनंद होण्याची शक्यता राहिलेली नाहीं. मी जगाचा बादशहा झालों अशी बातमी कोणी सांगितली तरी मला आनंद वाटणार नाहीं. लग्नाशिवाय दुसरी कोणचीही बातमी ऐकायला माझे कान तयार नाहींत !

**अशोक** : अरे, तशीच बातमी आहे!

**विनायक** : (हर्षानं) काय म्हणतोस? खरंच? सांग-सांग लवकर!

**अशोक** : हें बघ! उषेची चुलत बहीण आहे एक. सुशीला तिचं नांव. तिच्यासाठी मी तुझं नांव सुचवलं आहे.

**विनायक** : (अशोकला मिठी मारतो) वाहवा, खरा मित्र असावा तर असा! भगवान् श्रीकृष्णानं सुद्धां अर्जुनाचं इतकं हित साधलं नसेल. नरवीर तानाजीनं सुद्धां शिवाजीवर इतकं प्रेम केलं नसेल. गोबेल्स सुद्धां हिटलरसाठीं इतका झटला नसेल. पण का रे, तुझी ही सूचना लाथाडली तर नाहीं ना जाणार?

**अशोक** : तें सगळं आतां तुझ्यावर अवलंबून आहे. परवां बाबासाहेबांकडे तूं बरोबर चार वाजतां मुलगी पहायला ये.

**विनायक** : पण मी म्हणतों, मुलगी पहायची जरूरीच काय? परवां चार वाजतां लग्नच आटोपून टाकलं तर?

**अशोक** : मी काय म्हणतों तिकडे लक्ष दे विनायक! तूं बरोबर चार वाजतां तिथं यायचं. बाबासाहेबांचं तुझ्याबद्दल काय मत होतं त्यावर सगळं अवलंबून आहे. पहिलं म्हणजे तूं हा मूर्खपणा सोडून दिला पाहिजेस. आणि दुसरं म्हणजे तुझ्या बोलण्या चालण्यानें बाबासाहेब खूष झाले पाहिजेत. बाबासाहेब फार तापट आहेत, पण प्रेमळहि तितकेच आहेत. ते खूष झाले कीं सगळं जमलंच म्हणून समज. कारण सुशीलेला याबाबत स्वतःचं असं कांहीं मत नाहीं. बाबा वाक्यं प्रमाणम् हेंच तिचं धोरण आहे!

**विनायक** : ठीक ठीक! बाबासाहेबांना खूष करीन तरच नांवाचा विनायक.

बस्स– ह्यापुढें एकच ध्येय, एकच महामंत्र. बाबासाहेब खूष झालेच पाहिजेत! बाबासाहेब, तुमची काय इच्छा आहे सांगा– लवकर सांगा, बिलकूल लाजूं नका. पाहिजे तर आकाशांतील तारकांची सारी दौलत ह्या क्षणाला तुमच्या नांवानं लिहून देतों. साती समुद्रांचं पाणी तुमच्या डोक्यावर ओततों. काय वाटेल तें करतों. तुम्हाला खूष करून मी तुमचा तिसरा जांवई होणार-होणार म्हणजे काय झालोंच! अहाहा! झालों– मी सुशीलेचा पती झालों आणि सुशीला माझी पत्नी झाली! सुशीला, अग बाहेर अशोक आला आहे! त्याच्यासाठीं थोडा चहा आण बरं!

**अशोक :** (विनायकला हलवतो) पुरें झालं हें शेखमहंमदी स्वप्न!

**विनायक :** हें स्वप्न नसून ढळढळीत सत्य आहे. बाबासाहेब खुष झालेच पाहिजेत! (दूरवर बघून) पण हे दोन भुरटे कोण येत आहेत बरं इकडे?

**अशोक :** भुरटे? काय हें विनायक! अरे तो नरेश आहे! त्याची आणि तुझी ओळख करून देतों.

**विनायक :** नको. मला कोणाची ओळख नको! ह्यापुढं ओळखी बंद– गप्पा बंद– सगळं बंद! परवा बाबासाहेब खूष झालेच पाहिजेत! तो गोड प्रसंग साजरा करण्याच्या तयारीला मला आतां लागलं पाहिजे. जातों मी आतां. परवां बरोबर चार वाजतां बाबासाहेबांकडे येतों मी. बाबासाहेब, खिन्न होऊं नका– तुम्हाला खूष करण्यासाठीं हा विनायक महादेव देशपांडे धावून येत आहे! बाबासाहेब खूष झाले पाहिजेत!

[ विनायक जातो. नरेश आणि दिवाकर प्रवेश करतात ]

**नरेश :** दिवाकर, हा माझा जिवलग मित्र अशोक. लवकरच हा माझ्या भावी पत्नीचा मेव्हणा होणार आहे. आणि अशोक, हे माझे मित्र दिवाकर. हे नुकतेच वाळवंटातून इकडे आले!

**अशोक :** वाळवंटांतून इकडे आले? मी नाहीं समजलों!

**नरेश :** आफ्रिकेंत कुठें वाळवंटाचा प्रदेश आहे ना, तिकडून दिवाकर नुक-

तेच हिंदुस्तानांत आले. गेल्या महायुद्धांत दिवाकर मोठ्या शौर्यानें लढले. दिवाकरांच्या विलक्षण शौर्यामुळंच शेवटीं जर्मन सेनापती रोमेल ह्याला पळ काढावा लागला. असंच ना दिवाकर ?

**दिवाकर :** असं मी स्वतः म्हणूं नये; पण तुम्ही जें बोललांत, तें अगदीं खरं आहे !

**नरेश :** घरचेहि जमीनदार आहेत दिवाकर. जर्मनीचा संपूर्ण पराभव झाल्यामुळं लग्न करायला ते आतां मोकळे झाले आहेत. बाबासाहेबहि सुशीला-ताईसाठीं वर शोधताहेत. तेव्हां मी बाबासाहेबांना दिवाकरांचं नांव सुचवलं. तुझी सुद्धां मदत पाहिजे ह्या कार्यांत आम्हांला. कां ? स्तब्ध कां ?

**अशोक :** अशी मदत करतां आली असती तर मला आनंदच झाला असता ! पण सुशीलेसाठीं माझ्या एका मित्राचं नांव मी स्वतःच सुचवलं असल्यानें माझा अगदी निरुपाय आहे.

**नरेश :** असं हो ? पण मी बाबासाहेबांजवळ दिवाकरांबद्दल गोष्ट काढली.

**अशोक :** मग काय म्हणाले ते ?

**नरेश :** त्यांनीं परवां तीन वाजतां दिवाकरांना मुलगी पहायला बोलावलं आहे !

**अशोक :** असं ? आणि विनायकाला मुलगी दाखविण्याचा कार्यक्रम त्याच दिवशीं चार वाजतां आहे. म्हणजे एकंदरींत, एकाच दिवशीं दोन विवाहेच्छु तरुणांची परीक्षा घेण्याचा बाबासाहेबांचा मानस दिसतो. सुशीचं स्वयंवरच आहे म्हणाना ! चला ! या स्वयंवराच्या पूर्वतयारीला लागलं पाहिजे आतां ! चलायचं ?

**नरेश :** आम्ही जरा पुढं जातों. कारण दिवाकरांना या गांवाची लष्करी दृष्टीनं पहाणी करायची आहे. असंच ना दिवाकर ?

**दिवाकर :** हो ! लष्करांत आतांपर्यंतचं आयुष्य गेल्यामुळं प्रत्येक वस्तूची लष्करी दृष्टीनं पहाणी करायची मला संवय लागली आहे. जेवणापूर्वी मी

अन्नाची सुद्धां अशी पहाणी करतों, सोडत नाहीं !

**अशोक :** ( हंसून ) परवां मुलगी सुद्धां तुम्ही लष्करी दृष्टीनेंच पहाणार असाल ?

**दिवाकर :** कसं बोललांत ? माझ्या मनातलं नेमकं कसं ओळखलंत हो तुम्ही ? एकंदरीत, ह्या गांवांतल्या लोकांनाहि डोकीं आहेत म्हणायची !

**अशोक :** पण अलिकडे मात्र ह्यां गांवांत डोकीं नसलेलीं माणसं दिसूं लागली आहेत !

**दिवाकर :** अहो, त्यांत नवल कांहींच नाहीं ! युद्धांत काय कमी लोकांची डोकीं उडालीं ? अर्थात् डोकीं नसलेलीं माणसं आतां दिसूं लागणारच !

**नरेश :** चला दिवाकर, अपल्याला वेळ होईल.

**दिवाकर :** कुठं जायचं ?

**नरेश :** गांवाची लष्करी दृष्टीनें पहाणी करायची आहे ना ?

**दिवाकर :** गांवाची लष्करी दृष्टीनें पहाणी करायची इच्छा आहे तुमची ?

**नरेश :** अहो, माझी नाहीं, तुमची !

**दिवाकर :** माझी ? म्हणजे ? पहाणी करायची कोणाची ? गांवाची कीं माझी ?

**नरेश :** तुम्ही नाहीं म्हणालांत कां, कीं ह्या गांवाची मला लष्करी दृष्टीनें पहाणी करायची आहे ?

**दिवाकर :** बरोबर ! मला ह्या गांवाची लष्करी दृष्टीनें पहाणी करायची आहे. म्हणून तर आपण बाहेर पडलों ना नरेश ? भले, विसरलांत कीं काय सारं ?

**नरेश :** छे, छे, विसरेन कसा ? चला लवकर, नाहीं तर वेळ होईल आपल्याला ! बरं आहे अशोक, भेटूं मग परवां !

( नरेश व दिवाकर जातात. )

## प्रवेश तिसरा

[ अण्णांच्या बैठकीची खोली. एका आरामखुर्चीवर बसून अण्णा गीतेचें अध्ययन करीत आहेत. त्यांचा नोकर बाबाखान झटकण्यानें फर्निचर वगैरे साफ करीत आहे. गीतेच्या अध्ययनापेक्षां अण्णांचें बाबाखानाकडेच अधिक लक्ष असल्याचें दिसून येतें ]

**अण्णा :** ( वाचतात ) यो मां पश्यति सर्वत्र सर्वच मयि पश्यति ॥ तस्याहं न प्रणश्यामि, स च मे न प्रणश्यति ॥ काय ग्रंथ आहे गीता ! एकेक शब्द म्हणजे मोत्याचा दाणा ! ( वाचतात ) यो मां पश्यति सर्वत्र, सर्वंच मयि पश्यति, तस्याहं न प्रणश्यामि, स च मे न प्रणश्यति ! वा ! वा ! बाबाखान ! भगवान् श्रीकृष्णांनीं काय म्हटलं आहे ? यो मां पश्यति सर्वत्र–म्हणजे जो मला सर्वत्र पाहतो; सर्वंच मयि पश्यति–म्हणजे, माझ्या ठिकाणींच जो सर्वांना पाहतो; तस्याहं न प्रणश्यामि–म्हणजे, त्याच्या नजरेआड मी कधींही होत नाहीं; आणि, स च मे न प्रणश्यति–म्हणजे, तोहि माझ्या नजरेआड कधीं होत नाहीं ! थोडक्यांत म्हणजे, परमेश्वराची दृष्टि सगळीकडे आहे–तुझ्याकडे आहे, माझ्याकडे आहे, ह्या खुर्चीकडे आहे, त्या टेबलाकडे आहे–सगळीकडे आहे ! साहजिकच आहे–विश्व व्यापुनी दशांगुळे उरला ! त्याची दृष्टि सगळीकडे असणारच ! काय बाबाखान, आलं कां डोक्यांत ?

**बाबाखान :** मालक, थोडक्यांत म्हणजे तुमच्यासारखी दृष्टि म्हणा ना !

**अण्णा :** ( कौतुकानें ) माझ्यासारखी ? मी तुला परमेश्वरासारखा वाटतों कां रे ? अं ?

**बाबाखान :** मला काय कळतं त्यातलं मालक ? पण शेजारचा लखूशेट म्हणत होता !

**अण्णा :** ( कौतुकानें ) काय म्हणत होता ? अण्णा परमेश्वरासारखे आहेत असं म्हणत होता ?

**बाबाखान :** म्हणत होता–अण्णाचं एवढं वय झालं तरी त्याची दृष्टि उंदरासारखी सगळीकडे भिरभिरत असते !

**अण्णा :** ( पुस्तक दूर फेकतो ) असं ? अरे लब्ग्या ! थांब तुला आतां लंबाच करतों एकदां ! बदनामी करतोस काय माझी ? समजलास काय म्हणावं तूं– याद राखून रहा ! गांठ ह्या अण्णाशीं आहे ! आणखीं काय म्हणत होता तो चोर ?

**बाबाखान :** पुष्कळ बडबडत होता मालक तो !

**अण्णा :** अस्सं, त्याच्या पोटांतलं तूपच एकदां बाहेर काढतों, त्याशिवाय नाहीं ठिकाणावर यायचा तो ! काय लोक आहेत हे ! दुसऱ्यांच्या कुचाळक्या, टवाळक्या केल्याशिवाय ह्या लोकांना जेवणच जात नाहीं.

**बाबाखान :** लोकांची नियतच बिघडली आहे मालक आजकाल ! ह्यानं त्याची टवाळी करावी, त्यानं ह्याची टवाळी करावी ! मालक, खरं सांगूं कां ? माणसामाणसांत आजकाल आपुलकीच उरली नाहीं. कुत्र्याप्रमाणं एकमेकांवर सारखे गुरगुरतात, फुरफुरतात. जन्म माणसांचा पण वागणं कुत्र्यांचं !

**अण्णा :** वा, वा, बाबाखान ! माझ्या सहवासांत राहून बरंच बोलायला लागलास कीं !

**बाबाखान :** असं म्हणूं नका मालक ! मी पुस्तकं शिकलों नाहीं म्हणून काय झालं ? मी खूप ऐकलं, खूप पाहिलं. माझं मत झालं आहे कीं, माणसा-माणसांत आज आपुलकी उरली नाहीं.

**अण्णा :** मग काय, म्हणणं काय आहे तुझं ? अरे वेड्या, हें चालायचं !

**बाबाखान :** नाहीं ! त्यावर उपाय आहे ! मी एक तोडगा शोधून काढला आहे–अगदी रामबाण तोडगा ! सांगूं ?

**अण्णा :** हं ! चालूं दे पुराण !

**बाबाखान :** माझं असं मत आहे, कीं पुरुषमाणसं एकमेकांना भेटलीं कीं, त्यांनीं पहिले कूट एकमेकांना कडकडून मिठी मारावी. बायाबायांनींहि असंच करावं. म्हणजे होईल काय कीं, एकमेकांत आपुलकी निर्माण होईल आणि सारी दुनिया सुखी होईल !

**अण्णा :** अस्सं ! फार शहाणा आहेस तूं !

**बाबाखान :** आणि मालक, आज आपल्याकडे हिंदू-मुसलमानांच्या काय मारामाऱ्या चालल्या आहेत ! जसें कांहीं बोके भांडताहेत बेटे !

**अण्णा :** त्यावरहि तुझ्याजवळ एखादा तोडगा असेलच !

**बाबाखान :** आहे तर ! मालक, माझ्याजवळ सगळ्या रोगांवर औषधं आहेत. हिंदू-मुसलमानांचीं भांडणं मिटायचीं असतील तर, प्रत्येकानं आपला पोशाख बदलला पाहिजे.

**अण्णा :** पोशाख बदलला पाहिजे ?

**बाबाखान :** हो ! पोशाख बदलला पाहिजे ! प्रत्येकानं हिंदू-पद्धतीचं धोतर नेसावं आणि मुसलमान पद्धतीची लाल टोपी डोक्यावर चढवावी. असं झालं ना मालक, तर दोन दिवसात हिंदू-मुसलमानांची दिलजमाई होईल. प्रयोग करून पहा मालक आणि मग बोला !

**अण्णा :** अरे चोरा ! मला सांगतोस काय प्रयोग करायला ? तुझ्या बापानं तरी प्रयोग केला होता कां असा कधीं ?

**बाबाखान :** हो मालक ! माझ्या बापानं माझं नांव बाबाखान ठेवलं, तें ह्याच धोरणानं !

**अण्णा :** अस्सं ! एकंदरीत दिवसेंदिवस तूं साधू होत चालला आहेस म्हणा-यचा. आतां तमाशा सुद्धां तुला वर्ज्य असेल. नाहीं ?

**बाबाखान :** नाहीं मालक ! तेवढं सांगूं नका ! तमाशा मला फार प्रिय

आहे ! रात्रीं तमाशा पाहिला नाहीं, तर झोप येणार नाहीं मला ! ( गाण गुणगुणत पुन्हा झटकण्यानें सामान साफ करूं लागतो. )

**अण्णा :** हं ? आज गाणंहि म्हणायला लागलास ? हें अंग कधीं हस्तगत केलंस तूं ?

**बाबाखान :** माझा आवाज हल्लीं लागत नाहीं मालक ! पण तरुणपणीं मी फार पट्टीचा गाणारा ! आमच्या गांववाल्यांनीं संशयाचा कल्लोळ हें नाटक केलं होतं. त्यांत मुख्य बाईचं काम मी केलं होतं !

**अण्णा :** ( ओरडून ) तूं ? बाईचं काम केलं होतंस ?

**बाबाखान :** सध्याच्या रूपावर जाऊं नका मालक माझ्या ! मूळचा मी फार देखणा ! संशयाचा कल्लोळ ह्या नाटकांत मी बाईच्या वेषांत थेटरांत उभा राहिलों रे राहिलों, कीं सगळया बाया फटाफट माना खालीं घालायच्या ! उगीच नाहीं ! आणि तें गाणं–संशय कां मणिं आला– असं उठवून द्यायचों मी, कीं सगळे लोक जागच्या जागीं चीत व्हायचे ! गाणं असावं तर संशय कां मणिं आला–बाकी कसलीं गाणीं ! हें गाणं एखादं गाढव गुणगुणलं तरी सुध्दां वेडा होईन मी. [ गुणगुणतो ]

**अण्णा :** तूं तें गुणगुणलंस म्हणजे गाढव गुणगुणल्यासारखंच आहे.

**बाबाखान :** मालक माझं असंहि मत आहे–

**अण्णा :** बंद कर वटवट ! गीतेचा अध्याय संपवीन म्हटलं तर तुझी बडबड सुरू झाली. ( पुस्तक उघडून ) यो मां पश्यति सर्वत्र, सर्वंच मयि पश्यति–अहाहा ! वाण्याकडून काल सामान आणायला सांगितलं होतं तुला, पण कामाच्या नांवानं शंख. वायफळ बडबड करायला सांगा फक्त ! जा आत्तां आणि सामान घेऊन ये !

**बाबाखान :** जी साब ( जाऊं लागतो )

**अण्णा :** त्याला म्हणावं कीं पैसे चारपांच दिवसांत देऊं.

**बाबाखान :** मालक, वाणी माझ्याजवळ पैशाचीं बातच काढणार नाहीं. तो मला फार मानतो !

**अण्णा :** तें बरोबर आहे–तुला सगळे मानतात! विद्वान् सर्वत्र पूज्यते! ( बाबाखान जातो ) काय या बाब्यानं वेळ खाल्ला माझा. मूर्ख लेकाचा! बरं, कुठवर आलं? यो मां पश्यति सर्वत्र, ( दारावर टिक टिक ) कोण आहे आतां? गीतेच्या अध्ययनांत काय अडथळे येताहेत सारखे! कोण? ( विनायक प्रवेश करतो ) विनायक? अरे वा! ये, ये, बैस, विश्रांति घे जरा!

**विनायक :** विश्रांति घेण्याची वेळ नाहीं अण्णा ही! आतां, एकच ध्येय–एकच महामंत्र–ते खूप झालेच पाहिजेत!

**अण्णा :** म्हणजे काय? मी नाहीं समजलों!

**विनायक :** ते सारं गुप्त आहे. नाहीं मी बोलत आतां! अण्णा, शेवटीं आमचा भाग्योदय झाला–झाला म्हणजे झाल्यासारखाच आहे. नाटकाची तयारी सगळी झाली आहे. आतां फक्त पडदाच उघडायचा अवकाश आहे! पडदा उद्यां चार वाजतां, थाटामाटानं उघडला जाईल. लवकर तुम्हांला जिलबीचं जेवण मिळणार! तुमच्या माहितीचा एखादां चांगला आचारी आहे कां हो? बायको मिळवून दिली नाहीं ती नाहीं, आतां निदान आचारी तरी पाहून द्या!

**अण्णा :** अरे गृहस्था, तूं काय बोलतो आहेस, कशाबद्दल बोलतो आहेस याचा कांहींच थांगपत्ता लागत नाहीं मला. आचारी काय, बायको काय, जिलबी काय,–काय आहे तरी काय भानगड ही?

**विनायक :** योग्य वेळीं सारं समजेल, सारा खुलासा होईल. ( पुस्तक उचलून ) गीतेचं अध्ययन चाललं होतं वाटतं अण्णा, तुमचं?

**अण्णा :** अरे, कसलं अध्ययन घेऊन बसलास! सगळा वेळ बाबानं खाल्ला!

**विनायक** ( आश्चर्यानें ) बाबानं? बाबा इथं आले होते?

**अण्णा :** बाबा दिवसांतले पांचसहा इथंच लोळत पडलेला असतो. महामूर्ख लेकाचा!

**विनायक** : ( ओरडून ) बाबांना तुम्ही महामूर्ख म्हणतां? एवढा मोठा माणूस तो !

**अण्णा** : बोकडाला सुद्धां दाढी आलेली असते. म्हणून तो कांहीं शहाणा ठरत नाहीं. बाबा रे, शहाणपणा वयावर अवलंबून नसतो !

**विनायक** : खरंच, बाबांशीं तुमचा इतका दाट परिचय आहे? खरं म्हणतां हें ?

**अण्णा** : वीस वर्षं बाबाला ओळखतों मी !

**विनायक** : वीस वर्षं ? वाहवा ! परमेश्वर एकदा प्रसन्न व्हायला लागला, कीं चहूबाजूंनीं प्रसन्न व्हायला लागतो हेंच खरं. परमेश्वराची माझ्यावर कृपा म्हणूनच अण्णा, तुमची आणि माझी ओळख झाली. अकारण ओळखी करून घेण्याबद्दल अशोक मला नेहमी दोष देतो. पण आतां तुम्हीच सांगा अण्णा, कीं तुमच्याशी जर मी ओळख करून घेतली नसती, तर ही भाग्याची वेळ कशी बरं आली असती ?

**अण्णा** : भाग्याची वेळ कशी ?

**विनायक** : तें नाहीं सांगणार मी.इतक्यांत. बाबांचा आणि तुमचा वीस वर्षांचा परिचय आहे ना ?

**अण्णा** : हो !

**विनायक** मग आतां असं करा. बाबांना आवडणाऱ्या गोष्टी कोणच्या तें मला सांगा बघूं. [ खिशातून कागद-पेन्सील काढतो ] लिहूनच घेतों, हो विसरायला नको. हं बोला-आटपा !

**अण्णा** : काय वेड लागलं आहे कीं काय तुला? बाब्याशीं काय संबंध तुझा—

**विनायक** : ते सध्यां कांहीं विचारायचं नाहीं. चला, सांगा बाबांना काय काय आवडतं तें !

**अण्णा** : अरे गृहस्था, बाबा माझा—

**विनायक** : ते मला माहीत कां नाहीं अण्णा ? आतां त्यासंबंधीं चर्चा नको.

वेळ फार थोडा उरला आहे अण्णा ! हं-बोला बघूं. सांगा तुमच्या बाबांच्या आवडी निवडी !

**अण्णा :** अरे पण बाबाला काय आवडतं, त्याला कांहीं महत्व आहे का ? बाबासारख्या माझ्या—

**विनायक :** पुन्हां तेंच ! अण्णा, माझा जीव नका खाऊं बुवा ! मी ही चौकशी करतों, त्याच्यामागे एक गोड गुपित आहे. तुम्हांला योग्य वेळीं सारं समजेल, सारा खुलासा होईल. हं सांगा बरं बाबांच्या आवडीनिवडी !

**अण्णा :** बाबाच्या आवडीनिवडी न ! ( आठवून ) हो ! बाबा हिंदू-मुसलमान ऐक्याचा मोठा पुरस्कर्ता आहे. त्याचं असं म्हणणं आहे,. कीं प्रत्येकानं हिंदू पद्धतीचं धोतर आणि मुसलमान पद्धतीची लाल टोपी असा पोशाख करावा !

**विनायक :** किती सुंदर कल्पना आहे ! लिहून घेऊं द्या मला. ( लिहितां लिहितां ) लाल टोपी म्हणजे ती टोपासारखी असते आणि वर काळया दोऱ्या असतात तीच ना ? लिहून घेतों-उगीच घोटाळा नको ! हं बोला पुढें !

**अण्णा :** माणसामाणसांत आपुलकी निर्माण झाली पाहिजे असं बाबा म्हणतो.

**विनायक :** बरोबर आहे बाबाचं म्हणणं !

**अण्णा :** आणि आपुलकी निर्माण करण्यासाठीं, भेट झाली कीं पुरुषांनीं एकमेकांना कडकडून मिठी मारावी असं बाबाचं मत आहे.

**विनायक :** ( अण्णांना मिठी मारतो ) अगदी बरोबर ! (लिहितांना वाचतो) भेटल्याबरोबर कडकडून मिठी मारावी. कंसांत, आपुलकी निर्माण करण्यासाठीं. ( लिहिणं थांबवून ) हं सांगा पुढें.

**अण्णा :** तसंच बाबाला तमाशा फार प्रिय आहे. रात्रीं तमाशा पाहिला नाहीं, तर बाबाला झोप येत नाहीं !

**विनायक :** हं ? होंहि आहे कां ? [ लिहितो. लिहिणें थांबवून ] एकंदरीत स्वारी बरीच रंगेल दिसते ! बरं पुढें ?

**अण्णा :** आणखी काय बरं ऽ ऽ ? हो, बाबाला गाण्याची फार आवड आहे. त्यांतहि–संशय का मनिं आला–हें गाणं बाबाला फार आवडतं. तो म्हणाला कीं, हें गाणं एखादं गाढव गुणगुणलं तरी सुद्धां मी वेडा होईन. महामूर्खच तो !

**विनायक :** थांबा [ लिहितो ] हं पुढें ?

**अण्णा :** पुष्कळ झालं हे ! पण मी म्हणतों,त्या महामूर्खाच्या आवडी-निवडींशीं करायचं तरी काय तुला ?

**विनायक :** [ कागदाची घडी घालून खिशांत ठेवतो ] अण्णा,अण्णा,अण्णा, अगदी ल्हान मुलासारखं करतां बुवा तुम्ही ! हा प्रश्न आतां पुन्हा विचारायचा नाहीं. योग्य वेळीं,योग्य प्रसंगी सर्व गोष्टींचा खुलासा होईल, उलगडा होईल.चला ! माझं काम झालं ! [ अण्णा बोलूं लागतात. त्यांच्या तोंडांत कागद खुपसतो ] बोलायचं नाहीं ! [ उठतो ]आतां भेटेन सावकाश. बहुतेक लग्नाची आमंत्रणपत्रिका घेऊनच येईन.[ स्वतःशींच हंसत ] बाबा आतां का खूष होणार नाहींत? बाबासाहेब खूष झालेच पाहिजेत !

[ जातो. पडदा. ]

*

## प्रवेश चवथा

[ बाबासाहेबांचा दिवाणखाना. दिवाणखान्यांत फक्त सुशीला असते. ]

**सुशीला :** [ गुणगुणते ]—“मी स्वप्न मनोहर हें बघतें, भुलतें, झुलतें, खुलतें, फुलतें !” खरंच, मी एखाद्या स्वप्नांत तर नाहीं ना ? ह्या दोन दिवसांत माझ्या भोंवतालची सृष्टि किती बदलून गेली आहे ! आनंद, आनंद सगळीकडे आनंद ओसंडून चालला आहे ! खरंच, किती वेडी आहे मी ! अजून मी विनायकांना पाहिलेलं सुद्धां नाहीं ! अशोक त्यांच्यासंबंधीं माझ्याजवळ बोलले आणि तेवढ्यावरून ही रम्य स्वप्नांची दौलत मी माझ्या भोंवती निर्माण करून घेतली ! पण त्यांत नवल तरी कसलं ? नळाची भेट होण्यापूर्वींच नाहीं कां दमयंतीची नळावर भक्ति जडली ? कसें असतील बरं विनायक ? अशोक म्हणाले कीं, ते प्रेमळ आहेत, दिलदार आहेत, खोडकर आहेत आणि विनोदी आहेत. पण माझ्या नाहीं हं खोड्या काढायच्या ! ...तुम्ही मला फार आवडता...खरंच......अगदी खरं !

( उषा व निशा प्रवेश करतात )

**निशा :** अग भामटे ! इकडे बसली आहेस हो ! तिकडे तुला शोधून शोधून माझे पाय दुखायला लागले.

**सुशीला :** पाय दुखायला लागले असतील नरेशांना शोधून शोधून ! आणि राग काढतेस मात्र माझ्यावर. चांगला न्याय आहे हा !

**निशा :** पण तूं इकडं एकेकटी काय करीत होतीस ? कुणाचं चिंतन चाललं होतं एवढं ? स्वप्नांत एखादा अनिरुद्ध तर नाहीं ना दिसला ?

उषा : अग, अशोकांनी हिच्यासाठीं एका तरुणाचं नांव सुचवलं आहे–काय बरं त्यांचं नांव ? होऽ–विनायक! विनायकांचंच चिंतन चाललं असेल! उषेनं निदान स्वप्नांत तरी अनिरुद्धाला पाहिलं होतं. पण आमची सुशी, विनायकांचं नुसतं गुणवर्णन ऐकूनच प्रणयनगरीमध्यें भ्रमण करूं लागली आहे. बरोबर आहे ना सुशे ? ( सुशीला हंसते ) कशी कळी खुलली आहे पण!

**सुशीला** : अशोक कधीं खोटं बोलायचें नाहींत!

**निशा** : अस्सं! म्हणजे प्रकरण एकंदरीत फार पुढें गेलेलं दिसतं आहे!

**सुशीला** : इश्श! म्हणजे काय ?

**निशा** : म्हणजे असं कीं, हे विनायक का कोण, त्यांनीं तुला बरंच ग्रासलेलं दिसतंय! आमच्या ह्या लाजऱ्या चंद्राला आतां लवकरच ग्रहण लागणार! देव करो आणि हें ग्रहण कधीं न सुटो! ( थांबून ) अग, पण खरंच! नरेशांनीं बाबासाहेबांना आणखी एक नांव सुचवलं आहे. त्यांचं नांव आहे दिवाकर. हे दिवाकर विनायकांपेक्षां फार चांगले आहेत!

**उषा** : नाहीं ग सुशे! विनायकच चांगले आहेत!

**निशा** : सुशे, दिवाकर त्यांच्या नांवाप्रमाणें फार तेजस्वी आहेत, पराक्रमी आहेत!

**उषा** : काय पराक्रम पाहिला आहेस ग त्यांचा तूं ?

**निशा** : ( डोळे मिटून ) त्यांचा जो पराक्रम मी पाहिला, तो इतका विलक्षण आहे कीं, तो सांगायला माझ्याजवळ शब्द नाहींत. त्यांचं रूप इतकं तेजःपुंज आहे, कीं तें पहायला माझ्याजवळ डोळे नाहींत. त्यांचा आवाज इतका धीर-गंभीर आहे, कीं तो ऐकायला माझ्याजवळ कान नाहींत. ( डोळे उघडते ) हेंच आतां साध्या भाषेंत सांगायचं म्हणजें, त्यांचा आवाज मी अजून कधीं ऐकला नाहीं कीं त्यांचा पराक्रम आणि रूप मी अजून कधीं पाहिलं नाहीं!

**उषा** : तरी सुद्धां तूं दिवाकरांची शिफारस करते आहेस!

**निशा** : आणि तूं ? तूं तरी पाहिलं आहेस का विनायकांना कधीं ? विनायक

मनुष्य आहे कां माकड आहे, हे तरी खात्रीनं सांगता येईल का तुला? अशोक म्हणतात म्हणून आपणहि म्हणायचं! म्हणतात ना, मोर नाचायला लागला की लांडोरहि नाचायला लागते. तें कांहीं नाहीं सुशे, तूं दिवाकराशींच लग्न कर ग!

**सुशीला :** आणि तूं हें दिवाकर-पुराण सुरू केलं आहेस, तें कोणाच्या सांगण्यावरून? नरेशांच्याच ना? बरं बाई, तुझा आग्रहच आहे, तर मी तुझ्या म्हणण्यासारखं करीन. मग तर झालं?

**निशा :** अग चळ! कोण दिवाकर अन् कोण विनायक. तूं अशोकांचं ऐकूं नकोस, नरेशांचं ऐकूं नकोस, उषेचं ऐकूं नकोस, आणि माझं तर नकोच नको! काय तें तुझ्या मनानंच ठरव. अग, नरेशांनी मला सांगितलं कीं, सुशीजवळ दिवाकरांची खूप स्तुति कर. म्हणून मी हे चार शब्द बोल्लें!

**उषा :** मला सुद्धां अशोकांनीं विनायकांची कैफियत मांडायला सांगितली होती तुझ्यापुढें. कोणी पाहिला आहे हा विनायक, काळा आहे कीं गोरा! तूं आपलं स्वतःच ठरव ग काय तें!

**निशा :** पुरुषांची दृष्टीच स्वार्थी. नरेश काय आणि अशोक काय-सारे एकाच माळेचे मणी! मित्राचंच घोडं पुढं ढकलायला पाहिजे त्यांना! सुशी-च्या मनाचा,मताचा विचार करतं का कुणी? तूं कोणाचं ऐकूं नकोस ग सुशे! हे सगळे पुरुष असेच स्वार्थी!

[बाबासाहेब प्रवेश करतात. उषा,निशा, सुशीला किंचित् गोंधळून उभ्या राहातात.]

**बाबासाहेब :** [खुर्चीवर बसतात] निशाताई, फार जोरांत टीकास्त्र चालवलं आहे पुरुषांवर? काय केलं बुवा पुरुषांनीं इतकं?

**निशा :** अशोक म्हणतात, सुशीनं विनायकांशी लग्न करावं, नरेश म्हणतात दिवाकराशी करावं, पण सुशीच्या मताची कोणी विचारपूस तरी करतं कां?

**बाबासाहेब :** आतां तुमची लग्नं झालीं कीं नवऱ्यांची चांगली खरडपट्टी काढा.

पण ज्या सुशीची बाजू घेऊन तुम्ही इतकं अकांडतांडव करतां, ती सुशी काय म्हणते आहे ? काय ग सुशे ? [सुशीला हंसते] निशे, उषे, ही सुशी तुमच्या-बरोबर खेळली, वाढली पण तिला बोलायला कांही शिकवलं नाहींत तुम्ही. बाकी तें बरं आहे म्हणा एका दृष्टीनं ! कशी शांत असते ती दिवसभर-नाहीं तर तुम्ही दोघी-सारखी तोंडं चाललेलीं असतात.

**निशा :** कांहीं स्त्रिया लग्नापूर्वी अबोल असतात. पण एकदां कां लग्न झालीं कीं त्या पट्टीच्या वकृत्यासारख्या धडाधड बोलूं लागतात. आणि त्यामुळें त्यांचे नवरे आपोआपच अबोल बनतात ! सुशीच्या नवऱ्याची धडगत कांहीं ठीक दिसत नाहीं बाई मला.

**उषा :** लग्नानंतर सुशी जर बोलून बोलून नवऱ्याला भंडावूं लागली, तर आपण तुझी तिकडे रवानगी करूं. तुझा धबधबा सुरूं झाला, म्हणजे सुशी आपोआप थंड होईल.

**बाबासाहेब :** आतां मी काय म्हणतों तें जरा ऐकतां कां ? (सगळ्या हंसतात) हें बघा, ह्या पंधरा दिवसांत तुम्हां तिघींची लग्नं उरकून टाकण्याचा मी निश्चय केला आहे. अशोकांचे वडील, तसेच नरेशांचे वडील-ही चांगली माणसं आहेत. पण त्यांच्या चांगुलपणाचा फायदा घेऊन, त्यांना आणखी थांबायला लावण्यांत अर्थ नाहीं आणि ते बरंहि नाहीं. सुशीचं लग्न आतां लवकर ठरवायला हवं. उद्यां दिवाकर आणि विनायक सुशीलेला बघायला येणार आहेत.

**उषा :** उद्यां ?

**बाबासाहेब :** हो उद्यांच ! दिवाकरांना बोलावलं आहे तीन वाजतां आणि विनायकांना चार वाजतां. सुशीनं काय तें सांगितल्यावर पुढच्या गोष्टी ठरवूं. तुम्ही दोघी जेवायचं कुठवर आलं आहे ते बघा बरं ! (उषा, निशा जातात) सुशे, काय मग ? मी आंखलेला बेत आहे ना पसंत ? सात आठ दिवसांत तुझी पसंती सांगशील ना मला ? ए वेडे ! बोल कीं !

**सुशीला :** तुम्ही ठरवाल ते मला मान्य आहे बाबा !

**बाबासाहेब :** (हंसून) लग्न माझं आहे कां तुझं? (सुशीला हंसते) तुझंच न? मग स्वतःचं मत सांगायला काय हरकत आहे तुला?

**सुशीला :** माझं मत तुमच्या मतापेक्षां वेगळं थोडंच असणार आहे? बाबा, तुम्ही सांगितल्याप्रमाणें वागण्यांत मला जो आनन्द वाटेल, तो दुसऱ्या कशानेंही वाटणार नाहीं !

**बाबासाहेब :** सुशे, तूं असं बोलायला लागलीस कीं, मला माझ्या धाकट्या भावाची, तुझ्या वडलांची आठवण होते. तुझ्यासारखेच डोळे- तुझ्यासारखीच नम्रता! तो मला सोडून गेला पण जातांना ही अमूल्य दौलत त्यानं माझ्या-जवळ दिली. सुशे! लग्न ही आयुष्याला निर्णायक वळण देणारी गोष्ट आहे. त्या बाबतीतला निर्णय प्रत्येकानें स्वतःच घ्यावा हें योग्य !

**सुशीला :** बाबा, माझा निर्णय तुमच्या निर्णयापेक्षां वेगळा असूं शकणार नाहीं! मी अबोल आहे पण आज बोलतें. मला आई नाहीं हें मला लहान-पणापासूनच ठाऊक होतं. पण वडील नाहींत हें फार मोठेपणीं समजलं, इतकी ममता तुम्ही माझ्यावर केलीत. आम्हां तिघींमध्यें मीच तुमची लाडकी आहे असं सगळे म्हणत आणि म्हणतात. लहानपणीं उषेशीं किंवा निशेशीं माझं भांडण झालं, तर माझी बाजू बरोबर कीं चूक हें न बघतां तुम्ही सदैव माझाच पाठपुरावा केलांत. वडिलांचं प्रेम अनुभवण्याचं भाग्य परमेश्वरानं माझ्या-पासून हिरावून घेतलं. पण इतर कोणालाहि लाभलं नसेल, अशा काकांच्या अपूर्व ममतेचं दान परमेश्वरानं मला दिलं. बाबा, तुमच्या शब्दासाठीं एकच काय, पण अगणित आयुष्यं मी ओवाळून टाकीन!

**बाबासाहेब :** बेटा, तूं क्वचित्‌च बोलतेस पण बोलायला लागलीस म्हणजे साक्षात् वागीश्वरीच अवतरल्यासारखं वाटतं. तुझ्यावर मुलीसारखी माया करण्यांत मी विशेष तें काय केलं? तुझ्यावर माया केली नसती तर मी नीच ठरलो असतो; तुझ्यावर माया केली म्हणून मी मोठा ठरत नाहीं! घरची सगळी मंडळी आपल्यावर प्रेम करतात म्हणून आपण त्यांना कृतज्ञ राहिलं

पाहिजे अशी तुझी भावना दिसते. वेडे! ममता ही स्वयंपूर्ण असते. ती कशाचीच अपेक्षा करीत नाहीं– अर्थात कृतज्ञतचीहि नाहीं. कोण कृतज्ञ आहे, कोण कृतघ्न आहे, कोण नीच आहे, कोण उदार आहे ह्याचा कधींहि विचार न करतां धरणी सर्वांना सहृदयतेनें आपल्या अंगावर खेळवते. खरी ममता धरणीच्या ममतेसारखीच निरपेक्ष असते. म्हणून आपल्या चुलत्याशीं, बहिणींशीं आपण कृतज्ञ राहिलं पाहिजे ही भावना एकसारखी मनांत वागवण्याचं सोडून दे. अशी भावना बाळगणं म्हणजे एक प्रकारचा परकेपणा दाखविण्यासारखंच नाहीं का ?

**सुशीला :** तुमच्याबद्दल परकेपणा! नाहीं- नाहीं! असं म्हणूं नका! बाबा, तुम्ही उषा- निशेपेक्षांही मला जवळ केलंत. माझे लहान-मोठे हट्ट पुरवलेत. मी खिन्न झाले तर तुम्हाला कधीं जेवण गेलं नाहीं. मला कोणी शब्द बोललेला तुम्ही कधीं सहन केला नाहीं. ही तुमची अपार माया जर सदैव माझ्या लक्षांत राहिली तर तो परकेपणा कसा बरं होइल? नाहीं! नाहीं! परकेपणा म्हणूं नका. तो शब्द माझ्या हृदयाला खुपतो, सलतो! (सुशीलेचे डोळे भरून येतात)

**बाबासाहेब :** हें काय? लगेच डोळयांत पाणी ? वेडे मुली! कसं होणार तुझं? अग, तूं परकेपणा दाखवतेस असं मी कधीं म्हणेन कां! पूस डोळे आणि हांस बघूं एकदां! (सुशीला हंसते) आपला विषयहि गेला वाहून तुझ्या अश्रूंबरोबर! माझं म्हणणं एवढंच कीं, लग्नाच्या बाबतींत तूं अगदी मनमोकळेपणा दाखवला पाहिजेस. मग सांगणार ना तूं तुझं मत मला ?

**सुशीला :** (लाजते) हो! सांगेन!

**बाबासाहेब :** हं! आतां कशी गाडी आली रुळावर? तूं विचार कर आणि सात आठ दिवसांत तुझी पसंती मला सांग. मग तर झालं ना? अग उषे, कुठवर आलं जेवणाचं! (उषा प्रवेश करते)

**उषा :** बाबा, झाली आहे तयारी सगळी! तुमचीच वाट पाहत आहोंत आम्ही.

**बाबासाहेब :** आणि तुझी बहीण कुठं आहे! (निशा पुढं येते) **हं! मग** उद्यां आपल्या घरीं समारंभ आहे, वधू दाखविण्याचा आणि वर पाहण्याचा. समजलं ना? चला आतां जेवायला! (बाबासाहेब जातात)

**उषा :** सुशे, काय चाललं होतं ग एवढं ?

**सुशीला :** इश्श! कुठें काय ?

**निशा :** सांगायचं नसेल तर नको सांगूस बाई!

**सुशीला :** अग, बाबा म्हणत होते कीं कोणचा मुलगा पसंत आहे हें तूं स्पष्टपणें सांगितलं पाहिजे!

**निशा :** हं मग!

**सुशीला :** मी शेवटी हो म्हटलं. पण मला नाहीं बाई एकटीला ठरवतां येणार! तुम्ही दोघींनीं मला मदत केली पाहिजे हं!

**बाबासाहेब :** (पडद्याआड्न) चलतां ना जेवायला? ए सुशे!

**सुशीला :** चला बाई लवकर!

(जातात. पडदा.)

# : २ :

## प्रवेश पहिला

[ बाबासाहेबांचा दिवाणखाना. बाबासाहेब, सुशीला, उषा, निशा, अशोक, नरेश आणि दिवाकर बसलेले आहेत असा पडदा उघडतो ]

**नरेश :** दिवाकर, हे बाबासाहेब काळे आणि बाबासाहेब, हे माझे मित्र दिवाकर. गेल्या महायुद्धांत हे आफ्रिकेंत मोठ्या शौर्यानं लढले. जर्मनीचा पराभव करण्याची जबाबदारी पार पाडल्यामुळं संसाराच्या नंदनवनांत पदक्षेपण करायला हे उत्सुक झाले आहेत. संसार सुद्धां एक संग्रामच आहे म्हणतात. अर्थात् दिवाकर ह्याहि संग्रामांत यशस्वी होतील असं भाकित करायला कांहीं हरकत नाहीं.

**बाबासाहेब :** ठीक ठीक ! तुम्ही किती दिवस आफ्रिकेत होतां ?

**दिवाकर :** मी जवळ जवळ चार वर्षं आफ्रिकेच्या वाळवंटांत काढलीं. आफ्रिकेतला प्रत्येक देश जवळ जवळ मी पालथा घातला. काय निसर्गरम्य प्रदेश आफ्रिका म्हणजे ! जन्माला यावं आणि आफ्रिका पहावी ! आफ्रिकेतला एकेक मनुष्य म्हणजे पहाडच. तिथली जंगलें म्हणजे पुराणांतल्या राक्ष-

सांच्या दाढ्याच ! आफ्रिकेंत असा एकहि प्रदेश उरला नाहीं, कीं जो मी पायाखालीं घातला नाहीं. इराक, सिरिया, लिबिया, छबिया, ॲबिसेनिया, टर्की, सरकी, पोलंड, हॉलंड—

**अशोक :** हो, हो, हो ! तुमची आफ्रिका सगळ्या जगावर आक्रमण करूं लागलेली दिसते ! थोडक्यांत म्हणजे, तुम्ही बारा गांवांचं पाणी प्यालेले आहांत !

**दिवाकर :** अहो, मी बारा गांवांचंच काय, पण उंटाच्या पोटातलं सुद्धां पाणी प्यालेलों आहे. वाळवंटांत पाण्याची कधीं कधीं इतकी टंचाई असते, कीं शेवटी उंटाचं पोट फोडून त्यातलं पाणी प्यावं लागतं. किती मधुर असतं तें पाणी म्हणून सांगूं बाबासाहेब ! जन्माला यावं आणि उंटाच्या पोटातलं पाणी प्यावं !

**उषा :** पण मी म्हणतें, वाळवंटांत हे उंट तरी कोठून येतात हो ?

**दिवाकर :** फार मार्मिक प्रश्न विचारलांत तुम्ही. हिंदुस्थानांत मार्मिक प्रश्न विचारणारे लोक तरी आहेत कुठे ? फारच छान प्रश्न विचारलांत. आपल्याकडे रस्त्यावर रात्रीं ठिकठिकाणीं दिवे लावलेले असतात ना ? त्याप्रमाणेंच वाळ-वंटात ठिकठिकाणीं उंट उभे केलेले असतात. ज्यांला तहान लागेल, त्यानं खुशाल उंटाचं पोट फोडून, तें नारळासारखं तोंडाला लावावं !

**निशा :** मग कधीं कधीं तुम्ही उंट सुध्दां खाल्ले असतील ?

**दिवाकर :** हो हो ! कधीं उंट, कधीं खुंट, कधीं सुरवंट – वाळवंटांत काय वाटेल ते खावं लागतं . पण त्यामुळं मनुष्य असा बनतो, कीं खावं काय ही विवंचना त्याला कधींहि भासत नाहीं !

**बाबासाहेब :** बरं, सध्यां आपण काय करतां ? अजूनहि आपण लष्करांतच आहांत ?

**दिवाकर :** सध्यां मी लष्करांत नाहीं. वास्तविक माझी योग्यता हिंदुस्थानचा सरसेनापती होण्याची, पण गुणांची कदर ही चीज आपल्याकडे आहेच कुठं ?

आज हा दुर्दैवी भारतवर्ष मागें राहिला, ह्याचं कारण माझ्यासारखीं रत्नं कोपऱ्यांत धूळ खात पडलीं आहेत हेंच आहे. तेंच मी अमेरिका किंवा रशियामध्यें असतो, तर सगळं जग गदगदून हलवलं असतं !

**निशा :** बरोबर आहे ! मघाशी आफ्रिकेतल्या देशांचीं नांवं सांगतांना सुद्धां तुम्ही सगळं जग गदगदून हलवलंत खरं !

**दिवाकर :** हो न ? अहो, पण तुमच्यासारखे गुणग्राहक लोक ह्या हिंदुस्थानांत आज आहेत कुठे ? बाजारबुणग्यांचा बाजार सगळा !

**बाबासाहेब :** सध्यां आपल्याला नोकरी वगैरे कांहीं ? लग्नापूर्वी नोकरी-धंदा कांहीं तरी हवा !

**नरेश :** बाबासाहेब, एक धनिक व्यापारी लवकरच येथे एक पांजरपोळ उघडणार आहे. पांजरपोळांतील गायींचे सरसेनापती म्हणून दिवाकरांची नेमणूक निश्चित झाली आहे !

**सुशीला :** गायींचे सरसेनापती ? म्हणजे ?

**अशोक :** गायींचे सरसेनापती म्हणजे गायी हाकणारे गृहस्थ !

**दिवाकर :** तुम्हाला वाटतं तितकं सोपं काम नाहीं तें ! गायीं ताब्यांत ठेवणं हें कर्म महाकठीण आहे. वास्तविक फक्त बैलच गायींना ताब्यांत ठेऊं शकेल. जें काम फक्त बैलच करूं शकेल, तें काम माझ्यावर सोपविण्यांत आलं आहे. वाटेल त्याला जमायचं नाहीं तें !

**बाबासाहेब :** पण ही नोकरी निश्चित आहे ना ? कोणचंहि काम वाईट नाहीं असं मानणारा मी मनुष्य आहे. मनुष्याला काम पाहिजे एवढंच माझं म्हणणं. काम नसलं तर मनुष्य स्वनाळू होतो, आळशी होतो आणि शेवटीं काम मिळालं, तरी तें करायला लागणारा उत्साह त्याच्या अंगांत उरत नाहीं.

**नरेश :** नाहीं ! ती भीति बिलकुल बाळगायचं कारण नाहीं. उद्यांपासूनच

दिवाकर आपल्या कामावर रुजूं होणार आहेत. पगारहि चांगला मिळणार आहे. शिवाय दिवाकर एक बडे जमीनदार आहेत.

**दिवाकर :** माझी जमीन उत्तम प्रकारची आहे. पण आमच्या लोकांना शेती तरी कुठे नीट करतां येते ? मी माझ्या जमिनीची आतां लष्करी दृष्टीनें आखणी केली आहे. जमिनीचे मुख्य सेनापती म्हणून काम करण्याचं माझ्या वडिलांनी मान्य केलं आहे !

**बाबासाहेब :** आपल्या एकेक कल्पना जरा विचित्र दिसतात . पण तें कांहीं कां असेना, आपल्याला नोकरी आहे, शेतीवाडी आहे, हें पुष्कळ आहे. शिवाय आयुष्यामधील आपले अनुभवहि विविध असतील.

**दिवाकर :** बाबासाहेब, एक एक अनुभव काय वर्णावा ? अफ्रिकेंत एकदा मी नदीवर पाणी प्यायला गेलों. मजा अशी कीं, जर्मनीचा सेनापती रोमेल हा सुद्धां नदीवर त्याच वेळीं पाणी प्यायला आला, आणि मग काय विचारतां ? मी त्याच्याकडे डोळे वटारून पाहतों आहे, तो माझ्याकडे डोळे वटारून पाहतों आहे–पांच मिनिटं झालीं, अर्धा तास झाला, दोन तास झाले–नुसते डोळे वटारून आम्ही एकमेकांकडे हे असें पाहत होतो (उठून अभिनय करतो) शेवटी आल्या मार्गानें रोमेल गुपचूप माघारी निघून गेला आणि मीहि मग परतलों. सगळ्या जगाला टरकावणारा रोमेल, पण माझ्या अंगाला हात लावायची कांहीं छाती झाली नाहीं बेट्याची !

**अशोक :** त्यांत नवल नाहीं ! सिंह उंदराला कशाला स्पर्श करील ?

**दिवाकर :** रोमेल्ला सुद्धां तुम्ही उंदीर म्हणतां ? आश्चर्य आहे बुवा !

**बाबासाहेब :** मी त्या अनुभवांबद्दल बोलत नव्हतों, दिवाकर ! युद्धांतले अनुभव कितीहि रोमांचकारी असले, तरी त्यांचा दैनंदिन जीवनांत फारसा उपयोग होऊं शकेल असं मला वाटत नाहीं. पण तुम्ही चार ठिकाणीं फिरलेले आहांत. तेव्हां अनुभवांच्या अभावीं जीवनांत अयशस्वी होण्याची तुमच्या बाबतीत धास्ती नाहीं. आमची सुशीला तुम्ही पाहतांच आहांत. तिचे गुण, अव-

गुणही तुम्हांला नरेशांकडून समजले असतील. लग्नाच्या बाबतितला अखेरचा निर्णय मी तिच्यावर सोंपविला आहे. शिवाय—

**दिवाकर :** तुमची सुशीला मला पसंत आहे. ह्या क्षणीं तिच्याशीं लग्न करायला मी एका पायावर तयार आहे.

**निशा :** अहो, इतकी घाई करूं नका. लग्न म्हणजे कांहीं लढाई नव्हे!

**अशोक :** एका दृष्टीनं लग्न आणि लढाई सारखीच! दोन्हींमध्यें बिचाऱ्या पुरुषालाच जिवावर उदार व्हावं लागतं!

**उषा :** हं! आतां तुमचं पुराण सुरूं होणार वाटतं? सुशे, तुला दिवाकरांना कांहीं विचारायचं असेल तर विचार ग!

**सुशीला :** त्यांच्या लष्करी खाक्याची मला बाई फार भीति वाटते. एखाद्या वेळीं ह्यांच्या बंदुकीची गोळी बायकोच्याच कपाळावर बसायची!

**नरेश :** तशी भीति बाळगायचं बिलकूल कारण नाहीं! खरं म्हणजें बंदुकीच्या बाराला भितात म्हणूनच सरकारनें ह्यांना लष्करातून काढून टाकलं. असंच ना दिवाकर?

**दिवाकर :** हो, पण त्यामध्यें सरकारचा गैरसमज झाला. वास्तविक मी भीत होतो बंदुकीनें निरपराधी लोक मरतील म्हणून- पण आमच्या मूर्ख कमांडरला वाटलं, कीं हा बंदुकीलाच घाबरतो. त्यानं मला एकदम नोकरींतून काढून टाकलं. मग माझा स्वाभिमान तरी थोडाच झोपी जाणार? मीहि संतापलों आणि नोकरीवर लाथ मारून निघून आलों.

**नरेश :** आणि त्या दिवसापासून दिवाकरांनीं बंदुकीला कधीं स्पर्श केला नाहीं. तेव्हां त्यांच्याजवळ नसलेल्या बंदुकीची सुशीलाताईंना भीति बाळगायचं मुळींच कारण नाहीं.

**दिवाकर :** वास्तविक आम्हां लष्करी पेशाच्या माणसांना बंदुकीखेरीज क्षणभरहि करमत नाहीं. (बाबासाहेबांच्या हातांत असलेल्या तपकिरीच्या डबीकडे बोट दाखवून) ही तपकिरीची डबी- हिच्या शिवाय तुम्हांला क्षण-

भरहि चालायचं नाहीं. बंदूक जवळ नसली, म्हणजे आम्हांला क्षणभरहि चैन पडणार नाहीं. पण ज्या अर्थी ह्यांना बंदुकीचं भय वाटतं, त्या अर्थी बंदुकीला कधींहि स्पर्श न करण्याचं अभिवचन मी तुम्हाला देतों. तसा लेखी करार करायलाहि माझी ना नाहीं.

**अशोक :** ह्या करारामुळें सुशीपेक्षां तुमचीच सोय अधिक होणार आहे. अर्थात् असा करार तुम्ही ताबडतोब कराल याबद्दल कुणालाच शंका वाटणार नाहीं.

**नरेश :** अशोक, तूं कितीहि उपरोधिक बोललास तरी दिवाकरांची योग्यता त्यामुळें कमी होणार नाहीं. दिवाकर लष्करांत गेले ही एकच गोष्ट त्यांच्या धैर्याचं, निर्भयतेचं प्रमाण म्हणून सांगतां येईल. शिवाय दिवाकरांना नोकरी आहे, शेतीवाडी आहे. ह्यापेक्षां अधिक काय पाहिजे? सुशीलाताईसाठीं ह्यापेक्षां अधिक चांगलं स्थळ शोधूनहि सांपडणार नाहीं असं माझं ठाम मत आहे. आणि विचारांतीं बाबासाहेबांनाहि हें मत पटेल याबद्दल मला शंका वाटत नाहीं!

**बाबासाहेब :** दिवाकरांबद्दल माझं मत चांगलं झालं असावं हा तुमचा तर्क, नरेश, चूक नाहीं. पण या बाबतींत अखेरचा शब्द सुशीचा राहील आणि हा निर्णय घ्यायला तिला कांहीं दिवस साहजिकच लागणार. अर्थात् सात आठ दिवसांतच तीं काय तें ठरवील; कारण पंधरा दिवसांत तिघींचीहि लग्नं उरकून टाकण्याचा मी निश्चय केला आहे. दिवाकर, आमच्या विनंतीला मान देऊन तुम्हीं इथं आलांत, तुमच्या सहवासाचा आम्हांला लाभ दिलांत याबद्दल मी तुमचा अतिशय आभारी आहे. आठ एक दिवसांतच मी तुम्हाला काय तें कळवीन.

**दिवाकर :** बाबासाहेब, सुशीलेसाठीं आठ दिवसच काय, पण आठ हजार वर्षं सुद्धां थांबायला मी तयार आहे! बरं आहे तर—मी आपली रजा घेतों.

(सर्वांना नमस्कार करतो. सर्व नमस्कार करतात.)

**बाबासाहेब :** ( उठून ) बरं आहे ! आपल्याला फार तसदी दिली. ( दिवाकर जातो ) हं काय सुशीलाबाई-एक परीक्षा संपली.-कसा वाटतो आहे मुलगा हा ?

**सुशीला :** मी अजून कांहींच मत बनवलं नाहीं. इतक्यांतच मत दिलं नाहीं, तर चालेल ना ?

**बाबासाहेब :** अग वेडे, न चालायला काय झालं ? माझी कांहीं घाई नाहीं. शिवाय अजून दुसरा मुलगा पाहायचा आहे आपल्याला, अशोकांनीं सुचवलेला ! काय नांव त्यांचं बरं ? हो ! विनायक महादेव देशपांडे ! त्यांना चार वाजतां यायला सांगितलं आहे आपण, नाहीं का ? झालीच वेळ आतां ! या दिवाकरांना घरचं कोण कोण आहे हो नरेश ?

**नरेश :** दिवाकरांना दोन भाऊ आहेत. तेहि लष्करांत असतात. आईबाप खेड्यावर राहून शेतीवाडी बघतात.

( गडी प्रवेश करतो )

**गडी :** ( अशोकाला ) साहेब, आपल्याकडे एक बहुरूपी आला आहे !

**अशोक :** बहुरूपी ? माझ्याकडे ?

( पुढें धोतर सोडलेलं, डोक्यावर उंच, लाल मुसलमान पद्धतीची टोपी, हातांत काठी व तोंडांत पान अशा थाटांत विनायक प्रवेश करतो. सर्व त्याच्याकडे व एकमेकांकडे आश्चर्यानं पाहूं लागतात. विनायकहि सर्वांकडे आळीपाळीनें पाहून हंसण्याचा प्रयत्न करतो. अशोक गोंधळून उभा राहतो. गडी जातो. )

**अशोक :** ( वर्तमानपत्र तोंडासमोर धरून फक्त विनायकाला ऐकूं जाईल अशा स्वरांत ) विन्या ! गाढवा—

**विनायक :** ( बाबासाहेबांना ) बाबासाहेब आपणच न ? माझा तर्क कधीं चुकायचा नाहीं ! बाबासाहेब, मी विनायक महादेव देशपांडे !

**बाबासाहेब :** तुम्ही ? तुम्ही विनायक महादेव देशपांडे ?

**सुशीला :** अशोकांनी गुणवर्णन केलेले विनायक ते हे !

**विनायक** : [ हंसून ] हो ! तोच मी विनायक महादेव देशपांडे ! आणि तुम्ही सुशीलाबाई न ? कसं ओळखलं ! ओळखी पटायला लागल्या म्हणजे धडाधड पटतात !

**अशोक** : [ वर्तमान तोंडासमोर धरून ] विनायक !

**विनायक** : बाबासाहेब, मी हिंदु–मुसलमान ऐक्यचा मोठा पुरस्कर्ता आहे. हिंदु पद्धतीचं धोतर आणि मुसलमान पद्धतीची टोपी घातली तर हिंदु–मुसलमानामध्यें ऐक्य व्हायला वेळ लागणार नाहीं हें तुमचं मत मला तंतोतंत पटलं. !

**बाबासाहेब** : काय, आहे काय प्रकार हा अशोक ?

**विनायक** : आणि मला गाण्याची सुद्धां फार आवड आहे. त्यातही तुमचं " संशय कां मनि आला. " हें गाणं मला गुणगुणायला फार आवडतं. ( गुण-गुणतो ) बाबासाहेब, तुमचं एक गुपित सांगूं–सांगूं ?

**बाबासाहेब** : माझं गुपित ?

**विनायक** : हो तुमचं गुपित–गोड गुपित ! सांगू ? "संशय कां मनिं आला" हें गाणं एखाद्या गाढवानं म्हटलं तरी सुद्धां तुम्ही वेडे होता ! ओळखलं कीं नाहीं ? काढा पेढे !

**निशा** : कोण धटिंघण आहे मेला हा ?

**उषा** : ( अशोकाकडे बघून ) कुठलं भूत धरून आणलं आहे हो तुम्ही हें ?

**अशोक** : ( वर्तमानपत्र तोंडासमोर धरून ) चालता हो येथून !

**विनायक** : ( अशोकाच्या हातांतील वर्तमानपत्र ओढतो. हंसून ) वर्तमान-पत्राच्या आडून कशाला बोलतोस रे ? अण्णांनीं मला सगळं सांगितलं आहे ! काळजी—

**बाबासाहेब** : ( चिडून उभे रहातात ) कोण मनुष्य आहे हा ?

**विनायक** : बरोबर, तुम्ही कां रागावलांत हें समजलं ! वास्तविक भेटल्या-बरोबर पहिली गोष्ट मी ती करायला हवी होती ! मनुष्य शद्बावरून आठवण

झाली ! बाबासाहेब, आजकाल माणसामाणसांत आपुलकीच राहिली नाहीं ! बोक्यासारखे भांडतात लेकाचे ! आपल्याप्रमाणं माझंही असं ठाम मत आहे कीं, भेटल्याबरोबर पुरुषांनीं एकमेकाला—

(झपाट्यानं पुढं जाऊन बाबासाहेबांना मिठी मारतो. गोंधळ होऊन सगळे उठतात.)

**बाबासाहेब** : ( संतापानें थरथरतात ) पाजी माणसा ! तुझ्या कवटीचे तुकडे करून टाकीन ! तूं समजलास काय ? म्हातारा असलों तरी तुझ्यासारखी छप्पन चिलटं मी जमिनीवर लोळवीन ! हरामखोरा—

**अशोक** : ( अगतिकपणें ) शांत व्हा बाबासाहेब !

**बाबासाहेब** : शांत व्हा ? अशोक, तुम्ही हें चालवलं आहे काय ? कोण हा पाजी इसम तुम्ही धरून आणलांत ?.

**उषा** : ( संतापानें ) बाबांचा असा अपमान करायचं तुमच्या मनांत तरी कसं आलं ?

**अशोक** : ( अगतिकपणें ) बाबासाहेब ! उषा–!

**विनायक** : ( समजुतीच्या स्वरांत ) बाबासाहेब, आपल्याला एवढं रागवायला काय झालं बरं ? तुमच्याप्रमाणं मलाहि तमाशा फार प्रिय आहे ! तुमच्याप्रमाणं रात्रीं तमाशा पाहिला नाहीं तर मलाही झोप येत नाहीं !

**बाबासाहेब** : ( क्रोधानें ) मला तमाशा प्रिय ? मला तमाशा पाहिल्याशिवाय झोप येत नाहीं ? थांब, तुझी जीभ उपटून टाकतो ! ( काठी उगारून त्वेषानें विनायकावर धावून जातात. नरेश त्यांना आवरतो. अशोक विनायकाला ढकलून देतो. )

**निशा** : बाबा–आंत चला–एक क्षणही थांबायला नको आतां इथं !

**बाबासाहेब** : नीच माणसा ! आतां तोंडांतून एक शब्द बाहेर काढलास तर तुझ्या हाडांची राखरांगोळी व्हायला वेळ लागणार नाहीं ! चला आतां, झाला हा तमाशा पुरे झाला ! क्षणभरही इथं थांबू नका ! ( ओरडून ) चला म्हणतो ना ? ( सुशीला, उषा, निशा, नरेश आणि बाबासाहेब जातात. अशोक त्यांच्याकडे अगतिकपणें पाहतो. )

**अशोक :** ( आवेगानं ) बाबासाहेब, मला क्षमा करा ! उषा, क्षमा कर मला ! ( कपाळावर हात ठेऊन )अरेरे ! काय झालं हें !

**विनायक :** खरंच, हें असं कसं झालं बरं ?

(अशोक खवळून मागें येतो )

**अशोक :** चालता हो इथून ! तुझ्यासारख्या माकडाला मी हाताशीं धरलं हा माझाच महामूर्खपणा झाला ! चालता हो-

**विनायक :** ( दीन मुद्रेनें ) अशोक !

**अशोक :** ( ओरडून ) चालता हो म्हणतों ना ?

**विनायक :** अशोक, बाबासाहेबांना ह्या सगळया गोष्टी आवडतात असं मला अण्णांनीं सांगितलं म्हणून—

**अशोक :** गेला अण्णा खड्डयांत आणि तूं पण त्याच्याबरोबर ! माझ्या डोळयासमोर क्षणभरही उभा राहूं नकोस ! चल नीघ !

( त्याच्या अंगावर धावून जातो. विनायक जातो. पडदा. )

## प्रवेश दुसरा

[बाग. दिवाकर येतो.]

**दिवाकर :** ह्या बागेंत फिरून फिरून माझा जीव अगदीं मेटाकुटीला आला आहे. आपल्या लोकांना शिस्तीचं महत्त्व समजणार तरी कधीं ? नरेशांनीं मला सहा वाजतां इथं यायला सांगितलं, पण त्यांचा मात्र अजून पत्ता नाहीं! पण ते दूर कोण दिसतं आहे बरं ? नरेशच असावेत! जरा पुढं जाऊन बघितलं पाहिजे. (पुढें जातो) नरेश, अहो नरेश–

(नरेश दुसऱ्या बाजूनें प्रवेश करतो)

**नरेश :** दिवाकर!

**दिवाकर :** (वळून) नरेश ? अहो, आतां माझी केवढी फसगत होत होती! माणसामाणसांत आजकाल किती साम्य दिसूं लागलं आहे. नाहीं ?

**नरेश :** दिवाकर, फार फार आनंदाची बातमी आहे! आपला संपूर्ण विजय झाला! आणि त्यांत मजा अशी कीं, विनायकानं स्वतःच्या मूर्खपणानं आपल्या पायावर धोंडा पाडून घेतला. तुमच्या पाठोपाठ विनायक वधू-परीक्षेसाठीं आला आणि त्यांत त्याचा संपूर्ण धुव्वा उडाला! दिवाकर, आतां जयश्री तुमच्याच गळ्यांत माळ घालणार हें नक्की!

**दिवाकर :** जयश्री ? ह्या बाबासाहेबांना मुली आहेत तरी किती हो ? आणि लग्नाची मुलगी तरी कोणती– सुशीला कीं जयश्री ?

**नरेश :** तसं नव्हे हो! जयश्री म्हणजे जय!

**दिवाकर :** जय! मुलीचं जय हें नांव आज मी प्रथमच ऐकतों आहे! हे लोक आपल्या मुलींचीं नांवं काय ठेवतील, याला आतां कांहीं धरबंध उरला नाहीं! या बाबतींत सरकारनं हस्तक्षेप करायची वेळ आतां आली आहे असं मला वाटतं!

**नरेश :** क्षमा करा– पण तुमचा गैरसमज झाला. बाबासाहेबांची आणि तुमची मुलाखत संपल्याबरोबर विनायक तिथं आला. आणि विनायक इतका विचित्रासारखा वागला कीं, बाबासाहेब संतापानें लाल झाले. सुशीलेचं लग्न आतां बाबासाहेब तुमच्याशींच लावून देणार हें निश्चित!

**दिवाकर :** दोन बायका करायला माझी कांहीं हरकत नाहीं नरेश! पण ह्या बाबतींत कांहीं कायदेशीर अडचण तर नाहीं ना येणार?

**नरेश :** दोन बायका? कोण दोन बायका?

**दिवाकर :** भले! बरीच तल्लख दिसते तुमची स्मरणशक्ति! अहो, एक सुशीला आणि दुसरी जयश्री!

**नरेश :** तुमचा सारखा घोटाळा होतो आहे दिवाकर! बाबासाहेबांकडे लग्नाची एकच मुलगी आहे आणि ती म्हणजे सुशीला! अन् आतां बाबासाहेब सुशीलेला तुमच्या पदरांत घालणार हें नक्की! अहो, विनायकानं भलता गोंधळ केला! एखाद्या बहुरूप्यासारखा वेष करून विनायक तिथं आला आणि खुशाल गाणं म्हणायला लागला! फार मजा आली!

**दिवाकर :** खरंच? इतकं रंगलं विनायकाचं गाणं?

**नरेश :** गाणं कसलं हो तें! पुढं तर विनायकानं अगदीं कहर केला! अहो, त्यानं खुशाल बाबासाहेबांना मिठी मारली!

**दिवाकर :** मिठी मारली? मग माझ्या वतीनं बाबासाहेबांना कोणी मिठी मारली? तुम्हीच ना?

**नरेश :** छे हो! बाबासाहेब शेवटीं इतके गरम झाले होते कीं, ते संतापानं विनायकाच्या अंगावर धांवून गेले! एकंदरींत झाला हा प्रकार आपल्या पथ्यावरच पडला! सुशीला तुमची पत्नी झाली असं समजायला आतां कांहीं हरकत नाहीं!

**दिवाकर :** आणि जयश्री?

**नरेश :** अहो, जयश्री नांवाची मुलगी नाहीं कोणी बाबासाहेबांकडे!

**दिवाकर :** असं असं! मग जयश्री ही बाबासाहेबांची बायको वाटतं?

**नरेश :** जयश्री नांवाची व्यक्तीच नाहीं हो कुणी! चला घरीं! आज आनंदानं मी अगदीं बेहोश झालों आहे! दिवाकर, तुम्ही भाग्यवान खरे! बाबासाहेबांचा तिसरा जांवई होण्याचा बहुमान तुम्हांला मिळणार याबद्दल मी तुमचं मनःपूर्वक अभिनंदन करतों!

**दिवाकर :** पण कां हो, बाबासाहेब हुंडा किती देणार?

**नरेश :** हुंड्याचं सोडा हो! मुलगी मिळाली म्हणजे झालं!

**दिवाकर :** असं कसं? मी तर उलट म्हणतों– हुंडा मिळाला म्हणजे झालं; मग मुलगी मिळाली नाहीं तरी चालेल! आणि दोन मुलींशीं लग्न करायचं म्हणजे हुंडाहि दुप्पट पाहिजे!

**नरेश :** दोन मुली कोण, दिवाकर? असं काय करतां?

**दिवाकर :** अरे हो! जयश्री बाबासाहेबांची आई नाहीं कां? मी तिला मुलगीच समजलों! थोडक्यांत म्हणजे, मी बाबासाहेबांचा तिसरा जांवई झालों म्हणायचा!

**नरेश :** यांत तिळमात्र शंका नाहीं! चला दिवाकर, या आनंदाप्रित्यर्थ आजचा दिवस आपण विजयदिनासारखा थाटानं साजरा करूं!

(जातात)

## प्रवेश तिसरा

[अण्णांच्या बैठकीची खोली. आराम खुर्चीवर बसून अण्णांचं गीतेचं अध्ययन चाललं आहे. बाबाखान जवळच उभा आहे.]

**अण्णा :** यो मां पश्यति सर्वत्र–वा, वा, वा! (पुस्तक ठेऊन देतो) या श्लोकाच्या पुढं गाडीच जात नाहीं माझी! हल्ली वर्दळच फार वाढली आहे लोकांची माझ्याकडे! दोष तरी कुणाला द्यायचा? मनुष्य मोठा असला कीं त्याच्याभोंवतीं लोक जमायचेच! आम्हीं मोठे झालों हीच आमची चूक झाली, बाबाखान!

**बाबाखान :** छे, छे, मालक! आपली उमर वाढत चालली, यांत आपला काय बरं दोष? मी तरी काय कमी मोठा आहे? पन्नाशींत आलों आहे, मालक!

**अण्णा :** तुझ्यासारखे मोठे लोक गल्लोगल्लीं पडले आहेत. बाबा रे, मोठेपणा गुणांवर अवलंबून असतो बरं! काल रात्रीं मी फुलकेबुवांच्या कथेला गेलो होतों. एवढा मोठा आणि प्रशस्त फुलकेबुवा, पण मला पाहिल्याबरोबर तरतर विंचवासारखा पुढें आला. आणि त्यानं मला अगदीं जवळ, आपल्या पायापाशीं बसवलं!

**बाबाखान :** मालक, हें चुकलं! खरं म्हणजे तुम्ही त्यांच्या डोक्यापाशीं बसायचं, पायापाशीं नाहीं!

**अण्णा :** महामूर्खा, तो काय झोपून कथा सांगत होता तर त्यांच्या डोक्या-पाशीं बसायचं मी? पण काय सांगूं बाबाखान, फुलकेबुवासारखा कथेकरी फुलकेबुवाच! काल त्यानं सुशिक्षित बायकांवर असा कांहीं कडकडून हल्ला चढवला म्हणतोस कीं यंव्! बायकांना पुरुषांप्रमाणें समान हक्क पाहिजेत म्हणे! फुलकेबुवांनीं दाणादाण उडवून दिली बेट्यांची!

**बाबाखान :** फार वाईट मालक!

**अण्णा :** कोण वाईट ?

**बाबाखान :** बायकांना पुरुषांइतके हक्क द्या, असं म्हणणारे लोक फार वाईट. पूर्वीची गोष्ट आहे. आमच्या गांवांत एक भाषण झालं. भाषणवाला खास कलकत्त्याहून मागवला होता. त्याचं म्हणणं हेंच पडलं–बायकांना समान हक्क द्या! माझ्या मनावर फार परिणाम झाला. मी घरीं गेलों आणि बायकोला म्हणालों–उद्यांपासून तुझे–माझे हक्क सारखे. दुसऱ्या दिवशीं काय झालं, माहीत आहे, मालक ?

**अण्णा :** काय झालं ?

**बाबाखान :** दुसऱ्या दिवशीं बायको काठी घेऊन माझ्या अंगावर धावून आली अन् म्हणाली–इतके दिवस तुम्हीं मला बडवलंत–आतां मी तुम्हांला बडवणार! त्या दिवसापासून कानाला खडा लावून घेतला, कीं बाया माणसांना त्यांची पायरी कधीं सोडूं द्यायची नाहीं! या बाबतींत मी एक तमाशा रचला होता. आणि गांववाल्यांना करून दाखवला होता. तमाशा असा रंगायचा, कीं तुमच्या फुलकेबुवांची कथा म्हणजे त्यापुढें नुसता कचरा!

**अण्णा :** मूर्खा! फुलकेबुवांच्या कथेला कचरा म्हणतोस ? बाबाखान, जसजसं तुझं वय वाढत चाललं आहे, तसतसा तुझा मूर्खपणाहि वाढतो आहे. माझ्या सहवासांत राहून तुझी ही स्थिती व्हावी हें आश्चर्य आहे!

**बाबाखान :** शेजारचा लखूशेट असंच म्हणत होता.

**अण्णा :** (खवळून) काय म्हणत होता ?

**बाबाखान :** म्हणत होता, अण्णांच्या सहवासांत राहून राहून तुझा सुद्धां अगदीं अण्णा झाला आहे.

**अण्णा :** त्या लखूशेटला म्हणावं, तोंड सांभाळून बोल, नाहींतर काठीनं टाळकं शेकून काढीन, सोडणार नाहीं!

(विनायक काठी घेऊन प्रवेश करतो. पोशाख पहिल्या प्रवेशांतील पोशाखाप्रमाणें.)

**विनायक :** आणि मी सुद्धां तुमचं टाळकं काठीनं शेकून काढतों, सोडत नाहीं. अण्णा, तुम्ही इतके नीच, पाजी, हलकट, हरामखोर असाल अशी मला स्वप्नांत सुद्धां शंका आली नसती, ( काठी आपटून ) ताबडतोब जबाब द्या, नाहींतर ह्या काठीचे तडाखे खायला तयार व्हा!

**अण्णा :** अरे, अरे, झालं काय? भांग पिऊन आलास कीं काय?

**विनायक :** भांग पिऊन आलास कां म्हणून मला पुन्हा विचारतां? चोर तो चोर आणि पुन्हा शिरजोर? कुठं पाप फेडाल अण्णा, कुठं पाप फेडाल? अहो, निदान मनाची नाहीं तरी जनाची ठेवायची होतीस! [ काठी-आपटीत ] जबाब द्या—चला आटपा! मला वेळ नाहीं थांबायला. ही काठी तुमच्या डोक्यावर तुटून पडायला उत्सुक झाली आहे. तिची इच्छा मला पुरी करायलाच पाहिजे. चला, उघडा तोंड, नाहींतर ह्या दांडक्यानं तुमचं तोंड उघडं करायला मी मागेपुढें पाहणार नाहीं. हो, मी बिघडलों म्हणजे फार वाईट आहे!

**अण्णा :** अरे गृहस्था, पण झालं काय?

**विनायक :** पुन्हां तेंच! गृहस्थ होण्याच्या मार्गावर मी असतां, त्या रस्त्यांत भला मोठा खड्डा तुम्ही खणलांत आणि पुन्हां गृहस्थ म्हणून मला हिणवतां? तुमचं कुठलं घोडं मी मारलं होतं म्हणून तुम्ही इतका नीचपणा केलांत? तीन लग्नानंतर चवथं लग्न तुम्ही करायला निघाले आणि मी मध्यें आडवा पडलों असं तर कांहीं नव्हतं ना? बोला जबाब द्या!

**अण्णा :** हें बघ विनायक, उगीच आरडाओरड केल्यानं काय मिळणार आहे? [ बाबाखानला ] तूं जा रे तिकडे. [ बाबाखान जातो ] बैस इथं बघूं! ( विनायक बसतो ) ती काठी दूर टाकून दे. ( त्याच्या हात तील काठी काढून घेतो) हं, सांग आतां बघूं काय भानगड आहे ही! ( विनायक स्तब्ध राहतो ) सांग कीं आतां!

**विनायक :** ( हताश स्वरानें ) काय सांगूं अण्णा? सांगायचं काय राहिलं आहे आतां?

**अण्णा :** अरे, पण झालं तरी काय ?

**विनायक :** अण्णा, तुमचा खेळ झाला पण माझा जीव गेला. माझ्या ओठाशीं आलेला पेला तुम्ही, तुम्ही काढून घेतलांत. माझं जीवन तुम्ही बरबाद केलंत, इतकं कीं, कुठेंहि डोकं वर काढायला मला जागा ठेवली नाहींत. तुम्ही केवळ दुष्टपणानं माझं सुख हिरावून घेतलंत. माझ्या आशा-आकांक्षांवर निखारे टाकून त्यांची राख केलीत. काय, काय मिळालं, अण्णा, तुम्हाला हें करून कोणती जहागिरी मिळवलींत तुम्ही ? वडलांसारखे आदरणीय वृद्ध गृहस्थ म्हणून मी तुमच्याकडे पाहत होतों, पण तुम्ही माझा साफ गळा कापलांत. माझं लग्न होत असलेलं तुम्हाला पाहवलं नाहीं. अण्णा, तुम्हाला परमेश्वर कधीं क्षमा करणार नाहीं-कधीं क्षमा करणार नाहीं ! ज्या अशोकानं आजपर्यंत माझ्या-वर पाठच्या भावासारखं प्रेम केलं, त्याची स्थिती सुद्धां मी इतकी अनुकंपनीय करून टाकली, कीं माझ्या मूर्खपणामुळं त्याचं लग्न सुद्धां मोडेल की काय, अशी धास्ती निर्माण झाली. माझं लग्न मोडलं तर मोडलं. पण ह्या घटनेमुळें अशोकाचं लग्न मोडलं तर त्याला कोणत्या, कोणत्या तोंडानं, अण्णा, मी जाब देऊं ? मी घरीं आल्याबरोबर त्याला सविस्तर, क्षमा याचना करणारं पत्र धाडलं. परमेश्वरा, माझ्या मूर्खपणाबद्दल मला काय शासन करायचं असेल तें कर ! पण माझ्या मित्राला त्याची झळ लागूं देऊं नकोस ! आणि अण्णा तुम्ही-तुम्ही ह्याला जबाबदार आहांत ! काय मिळालं तुम्हांला-काय मिळालं ?

**अण्णा :** विनायक ,तुझं बोलणंच मला समजत नाहीं! तुझं लग्न ठरलं होतं केव्हा आणि मी तें मोडलं म्हणजें काय ? छे, छे, काहीं तरी भलताच घोटाळा झालेला दिसतो आहे !

**विनायक :** अण्णा ! अण्णा ! तुम्हांला स्मृतिभ्रंश झाला आहे का हो ? भट ब्रेन टॉनिकची एक बाटली देऊं कां आणून तुम्हांला ? बाबासाहेब काळे दिवसांतले पांचसहा तास माझ्या घरीं लोळत पडलेले असतात, त्यांचा माझा वीस वर्षांचा परिचय आहे, त्यांना अमूक आवडतं, तमूक आवडतं-हें सारं तुम्हीच मला सांगितलंत ना ? मी तें सगळं खरं मानून बाबासाहेबांकडे गेलों आणि लाथा खाऊन परत आलों !

**अण्णा** : ( ओरडून ) बाबासाहेब काळे ? कोण बाबासाहेब काळे ? मी तुला जें सांगितलं तें बाबाखानाबद्दल, माझ्या नोकराबद्दल होतं. बाबाखान! ( बाबाखान येतो ) माझ्या प्रश्नांची थोडक्यांत उत्तरें दे. तूं माझ्याकडे दिवसांतलें किती तास असतोस ?

**बाबाखान** : मालक, त्याचं असं बघा कीं, कोंबडी—

**अण्णा** : ( ओरडून ) किती तास असतोस ?

**बाबाखान** : सहा तास !

**अण्णा** : तुला माझ्याकडे राहून किती वर्षं झालीं ?

**बाबाखान** : तुमची पाहिली बायको साळूबाई—

**अण्णा** : ( ओरडून ) किती वर्षं झालीं ?

**बाबाखान** : पंचवीस वर्षं !

**अण्णा** : मूर्खा, हिंदु-मुसलमान एकी कशानें होईल ?

**बाबाखान** : हां ! प्रत्येकानें धोतर नेसून डोक्यावर मुसलमानी टोपी चढवावी म्हणजे मालक—

**अण्णा** : महामूर्खा, आपलेपणा निर्माण करण्यासाठीं एकमेकांनीं भेटल्यावर काय करावं ?

**बाबासाहेब** : मालक, आजकाल माणसामाणसांत—

**अण्णा** : ( ओरडून ) काय करावं ?

**बाबाखान** : कडकडून मिठी मारावी, मालक !

**अण्णा** : ठीक ! आतां चालता हो इथून ! ( बाबाखान जातो ) सांग विनायक, काय खोटं सांगितलं मी तुला ? मी हें सारं सांगितलं बाबाखानाबद्दल. तुझी कल्पना झाली मी बोललों तुझ्या बाबासाहेबांबद्दल. यांत माझा काय दोष ? बाबासाहेब काळे नांवाप्रमाणं काळे आहेत, कीं गोरे आहेत, हें सुद्धां मला माहीत नाहीं अजून.

**विनायक :** पण अण्णा, तुमच्या बाबाखानाला काय आवडतं आणि काय आवडत नाहीं, ह्याला कांहीं महत्व आहे का हो ? मिटक्या मारीत वर्णन करावं असं बाबाखानामध्यें काय आहे ?

**अण्णा :** भल्या गृहस्था, नेमकं हेंच तुला मी जीव तोडून सांगत होतों, पण माझं बोलणंहि ऐकून घ्यायला तूं तयार नव्हतास ! मग आतां गैरसमज झाला तर माझ्यावर कां बरं राग ? कांहीं तरी घोटाळा होत आहे असं मला त्याच दिवशीं वाटलं. पण तूं मला बोलूं दिलं नाहींस. एकंदरीत झाला हा प्रकार फार वाईट झाला. पण त्याला तुझा धांदरटपणाच जबाबदार आहे. निदान माझा या बाबतीत दूरान्वयानेंहि संबंध पोंचत नाहीं. वेड्या, माझ्या जीवनाची आतां संध्याकाळ झाली आहे. तुझ्यासारख्या तरुणाचं लग्न मोडण्याचं पाप मी कसं करीन ? कां करीन ?

**विनायक :** ( आवेगानें ) अण्णा, मला क्षमा करा ! मी तुमचा फार अपराधी आहे. मी तुमच्यावर काठी उगारली, तुम्हांला नाहीं नाहीं त्या शिव्या दिल्या. मला स्वतःवरच सूड उगवावासा वाटतो, पण तो कसा उगवावा, हेंच अण्णा, मला समजत नाहीं. अण्णा, तुम्ही मला क्षमा करा !

**अण्णा :** बिलकूल वाईट वाटून घेऊं नकोस विनायक ! रागाच्या भरांत मनुष्य वाटेल तें बोलून जातो. त्या बोलण्याचा थोडाच विचार करायचा असतो ? चालायचंच ! असे प्रसंग माणसांच्या आयुष्यांत यायचेच ! असे प्रसंग येतात म्हणूनच त्याला माणसाचं आयुष्य म्हणायचं ! हें लग्न मोडलं तर मोडलं ! अरे बाबा, माझीं तीन लग्नं झालीं एवढंच तुला माहिती आहे. पण माझीं जवळजवळ दहा लग्नं मोडलीं, हें तुला माहीत आहे कां ?

**विनायक :** अण्णा, मला माझ्याबद्दल फारसं वाईट वाटत नाहीं. पण अशोक—त्याची परिस्थिती सुद्धां मी किती वाईट करून टाकली ! मला तुम्ही क्षमा कराल. पण अशोक कधीं क्षमा करणार नाहीं—कधीं क्षमा करणार नाहीं. ( अशोक प्रवेश करतो ) कोण ? अशोक ?

**अशोक :** (हंसून) होय अशोकच! विनायक, मी तुझ्या घरीं जाऊन आलों? तुझं पत्र मिळालं. (हंसतो) एकंदरीत भलताच घोटाळा झाला म्हणायचा!

**विनायक :** अशोक, तूं मला क्षमा केलीस कां? ह्या घटनमुळें बाबासाहेब आणि उषा तुझ्यावर रुष्ट तर झाले नाहींत ना?

**अशोक :** ते आधीं खूप रागावले होते, संतापले होते. पण तुझं पत्र मी त्यांना नेऊन दाखवलं. त्यामुळं त्यांचा राग मावळला. बाबासाहेबांचा राग म्हणजे वळवाचा पाऊस! ते जितके संतापी, तितकेच प्रेमळ आणि समजूतदार आहेत. सुशी, निशा, आणि उषा तर तुझं पत्र वाचून खूप हसल्या.

**विनायक :** खरंच?

**अशोक :** अगदीं खरं! अण्णांनीं एकंदरीत भलतीच थट्टा केली तुझी म्हणायची!

**अण्णा :** अहो, मी कसली थट्टा केली? सगळा गैरसमजमहाराजांचा प्रताप! मी बोलत होतों आमच्या नोकरांबद्दल, बाबाखानाबद्दल. विनायकाला वाटलं–मी बोललों बाबासाहेबांबद्दल. ह्यामधूनच हा सारा विनोद निर्माण झाला.

**विनायक :** पण हा विनोद मला फार महाग पडला. ही टोपी मी मुद्दाम खरेदी केली. ती आतां तुमच्या बाबाखानाला बहाल करा!

**अशोक :** विनायक, मी तुला फार टाकून बोललों. रागाच्या भरांत माझ्या तोंडातून वाटेल ते शब्द निघून गेले. तूं माझ्यावर खूप रागावला असशील नाहीं?

**विनायक :** मित्रा, त्यावेळीं तूं मला बेदम चोप दिला असतास तरी तें क्षम्य ठरलं असतं. जाऊं द्या! त्या गोष्टीवर आतां पडदा पाडलेला बरा! ह्या प्रकरणाचा एकंदर सारांश असा सांगतां येईल, कीं सुशीलेशीं माझं लग्न होण्याचा संभव कायमचा नष्ट झाला. आणि ज्याच्या नांवमुळं हा सगळा

घोटाळा झाला, त्या बाबाखानाला ही नवी टोपी मिळाली. ह्या साऱ्या वाईटा-तून (टोपी उंच करून) हें एवढं चांगलं निघालं. बरं, आतां दिवाकर सुशीचं लग्न ठरलं असेलच?

**अशोक :** अजून सुशीनं कांहींच निर्णय घेतला नाहीं. निर्णय घ्यायला बाबासाहेबांनीं तिला एक आठवडा दिला आहे. (हलक्या स्वरांत) खरं सांगूं का विनायक? अरे, तिच्या मनांत तुझ्याबद्दल सुप्त प्रेमभावना आहे. परवांच्या प्रसंगानेंहि ती नष्ट झालेली नाहीं!

**विनायक :** काय म्हणतोस? धन्य आहे या विनायक महादेव देशपांडेची! अण्णा! अण्णा! (अण्णांना मिठी मारतो)

**अण्णा :** अरे, अरे, काय मनुष्य आहेस तूं!

**विनायक :** तुमचा पायगुण फार चांगला आहे अण्णा! तुम्ही भेटल्या-पासून माझी भाग्यरेषा अशी फुलूं लागली आहे कीं बस्स! सुशीलेशीं माझं लग्न होऊं द्या अण्णा, कीं मी तुमची सुवर्णतुलाच करतों! एका पारड्यांत बसले आहेत अण्णा अन् दुसऱ्या पारड्यांत ओततों आहे मी सोनं! अण्णा, खरंच तुम्ही माझे आगाखान आहांत आणि आगाखानाच्या बाबा-खानाला लग्नानिमित्त आणखी एक नवी टोपी!

**अण्णा :** अरे पण हो हो! लग्न तर होऊं दे आधीं!

**विनायक :** लग्न आतां झाल्यासारखंच आहे माझं! सुशीला माझी पत्नी झाली! सुशीलेला सुशी यापुढं फक्त मी म्हणणार! बाकीच्यांनीं सुशील म्हणायचं! कायदा म्हणजे कायदा—तो तुम्हाला सुद्धां लागू आहे अण्णा आणि तुला सुद्धां अशोक! हो, माणसानं प्रथमच स्पष्ट बोलावं हें बरं मागाऊन उगीच घोटाळा नको!

**अशोक :** हं, पुरें विनोबा मनोराज्य हें! तुला कांहीं सांगायचं म्हणजे सुद्धा चोरी आहे. अजून दिल्ली फार दूर आहे.

**विनायक :** दिल्ली अजून दूर आहे? काय म्हणतोस अशोक. तूं हे?

**अशोक :** हो, अजून दिल्ली फार दूर आहे. सुशीचं दिवाकरांशीं लग्न व्हावं म्हणून नरेशचा सारखा प्रयत्न चालू आहे. हा प्रयत्न हाणून पाडायचा असल्यास तूं शहाण्यासारखं वागलं पाहिजेस. तूं खुळा नाहींस हें सुशीलेला पटायला हवं! परवां तूं जो विक्षिप्तपणा केलास, तो संपूर्णपणें धुऊन टाकला तरच सुशीलेच्या प्राप्तीची तुला अशा आहे. ह्यासाठीं मी एक बेत आखला आहे.

**विनायक :** सांग, सांग, तुझा बेत मला! तूं फक्त बेत आखीत जा—ते पार पाडायची कामगिरी माझ्याकडे लागली.

**अशोक :** हें बघ, उद्यां सकाळीं सुशी बागेंत फिरायच्या निमित्तानें तुझी भेट घ्यायला येणार आहे. तूंहि सकाळीं बागेंत जा. तुझ्या वागण्या बोलण्याचा तिच्यावर काय परिणाम होतो, ह्यावर आतां सगळं अवलंबून आहे. तिथं जर कां गाडी उलटली, तर मात्र आशा करायला जागा नाहीं. शहाण्यासारखा बोल तिच्याशीं! तुझ्या बोलण्याची मोहिनी पडली पाहिजे तिच्यावर!

**विनायक :** त्याची तूं बिल्कूल काळजी करूं नकोस अशोक. मी उद्यां पहाटे बागेंत हजर आहे. सुशीलेला मी उद्यां जिंकणार, जिंकणार, जिंकणार!

**अशोक :** आणि काय रे, तुझ्या नोकरीचं काय झालं? नोकरी नसेल तर सुशीलेला जिंकूनहि उपयोग नाहीं; कारण नोकरी नसलेल्या माणसाला बाबासाहेब आपली लाडकी पुतणी द्यावयास कधींहि कबूल होणार नाहींत.

**विनायक :** तीहि काळजी नको. चंद्रप्रकाश लाकूड वखार आहे ना, तिथं व्यवस्थापक म्हणून माझी नेमणूक होणार आहे. अण्णांनीं खूप खटपट केली अणि तें आतां जमल्यासारखंच आहे, नाहीं कां हो अण्णा?

**अण्णा :** होय अशोक! चंद्रप्रकाश लाकूड वखार ह्या संस्थेचा मालक एका प्रामाणिक माणसाच्या शोधांत होता. मी विनायकाचं नांव सुचवलं. पगार चांगला आहे आणि मुख्य म्हणजे कोणाची हुकुमशाही नाहीं. आज-उद्यांच विनायकाला व्यवस्थापकाची जागा मिळेल, तेव्हां नोकरीची काळजी नको.

**अशोक** : मग काम झाल्यासारखंच आहे. (घड्याळाकडे पाहून) अरे, चार वाजले कीं! संध्याकाळीं बागेंत फिरायला जायचं आहे आज. गेलं पाहिजे मला आतां.

**विनायक** : उषेबरोबर फिरायला जायचं असेल. लपवूं नकोस माझ्यापासून.

**अशोक** : लपवालपवी कसली? लग्न ठरलं कीं लपवालपवीचा आपोआप अंत होतो. जातों मग मी. पण उद्यांचं लक्षांत आहे ना नीट? सुशीलेचा ग्रह चांगला झाला पाहिजे विनायक! बरं आहे अण्णासाहेब.

(अशोक जातो)

**विनायक** : (काळजीच्या स्वरांत) मोठा पेंचप्रसंग आहे बुवा अण्णा!

**अण्णा** : आतां कसला पेंचप्रसंग?

**विनायक** : पेंचप्रसंग नाहीं तर काय? उद्यां सुशीला माझ्यापुढं आली म्हणजे बोलायचं काय आणि कसं?

**अण्णा** : कसं म्हणजे?

**विनायक** : सोपं काम नाहीं अण्णा तें! प्रेमाची भाषा यायला पाहिजे त्याला. साध्या भाषेचा उपयोग नाहीं तिथें! अण्णा, तुम्ही तीन लग्नं केलीत. तुम्ही शिकवा बघूं मला प्रेमाची भाषा बोलायला!

**अण्णा** : तेवढं सांगूं नकोस! आमच्या वेळीं ही नसतीं लचांडं नव्हतीं. आमच्या पहिल्या बायकोचा तर आवाज सुद्धां मी कधीं ऐकला नाहीं. तिचा आवाज फार मधुर होता असं म्हणतात!

**विनायक** : मग आतां कसं करायचं हो अण्णा? प्रेमाच्या भाषेंत बोलल्याशिवाय, सुशीलेचं मन जिंकतां येईल अशी आशा करणं व्यर्थ आहे. उगीच हवापाण्याच्या गप्पा मारून कार्यभाग होणार नाहीं. तुमच्याजवळ कांहीं नाटकं–कादंबऱ्या आहेत? त्यांतली वाक्यं तरी पाठ करीन म्हणतों!

**अण्णा :** एक तर माझ्याजवळ नाटकं-कादंबऱ्या नाहींत आणि दुसरं म्हणजें, त्या नाटकं-कादंबऱ्या सुशीलेनं वाचल्या असल्या तर ती काय किंमत करील तुझी ? ती म्हणेल– हा नुसताच शिकवलेला पोपट दिसतो आहे !

**विनायक :** खरं आहे तुम्ही म्हणतां तें अण्णा. मग ह्यावर आतां उपाय काय ? प्रेमाची भाषा तर यायला पाहिजे. (विचार करून) हो, आहे एक युक्ति– ह्या टाळी अण्णा ! नाटककादंबरींतले शिळे प्रेमसंवाद पाठ करण्यापेक्षां खराखुरा प्रेमसंवाद ऐकायचा आणि तोच पाठ करायचा ! कसा उपाय आहे अण्णा हा ?

**अण्णा :** शाबास, शाबास ! आहेस खरा हुशार !

**विनायक :** आहे ना ? मग बरं ? शाळेंत असतांना मास्तर मला नेहमी म्हणायचे– विन्या, तुझं डोकं गंगेच्या खोऱ्यासारखं सुपीक आहे ! उगीच नाहीं अण्णा !

**अण्णा :** गंगेचा खोरा ? म्हणजे काय ?

**विनायक :** कुणा लेकाला माहित आहे अर्थ इथं ! पण मास्तर म्हणायचें खरें नेहमी !

**अण्णा :** तुला सुचलेला उपाय उत्तम आहे यांत शंकाच नाहीं. पण एक अडचण आहे. खराखुरा प्रेमसंवाद तुला ऐकायला कसा मिळणार ?

**विनायक :** नाहीं लक्षांत येत ? नाहींच येणार. तिथं गंगेच्या खोऱ्यासारखं सुपीक डोकंच पाहिजे. अहो, आतां संध्याकाळीं सहा वाजतां अशोक–उषा बागेंत जाणार आहेत ना ? ते बागेंत कुठं बसतात तें मला ठाऊक आहे. एका दगडाआड लपून बसतों आणि अशोकचीं सगळीं वाक्यं लिहून घेतों. आणि उद्या सकाळीं सुशीला भेटली कीं त्या प्रेमवचनांचा करतों तिच्यावर मारा ! कसा वाटतो आहे माझा बेत अण्णा तुम्हांला ?

**अण्णा :** अगदी उत्तम आहे. तुझं काम आतां फत्ते होणार यांत शंकाच नाहीं. खरंच किती हुशार आहेस विनायक तूं !

**विनायक :** सहा वाजायला आतां फारसा अवधी नाहीं. घरीं जाऊन कागद-पेन्सील घेतों आणि जातों बागेंत. बरं आहे मग अण्णा, रामराम ! दोनचार दिवसांत लग्नाचं आमंत्रण द्यायलाच येतों. (पुन्हां मागें फिरतो) नाहींतर असं करा ना अण्णा. तुम्ही पण चला माझ्याबरोबर प्रेम-संवाद ऐकायला ! नाहींतरी तीन लग्नं करून प्रेमसंवाद ही चीज काय आहे हें तुम्हाला ठाऊक नाहींच ! मग ही अनायासें आलेली संधी कां सोडतां ? एका दगडांत दोन पक्षी !

**अण्णा :** पसंत आहे तुझी कल्पना मला ! तूं हो पुढें, मी हा आलोंच.

[विनायक जातो. ]

## प्रवेश चवथा

[ बाग. अशोक आणि उषा प्रवेश करतात. ]

**अशोक :** हें काय ? किती उशीर केलास यायला ?

**उषा :** म्हणजे काय ? आपलं सहा वाजतां येथें यायचं ठरलं होतं ! अजून सहा वाजताहेत म्हटलं !

**अशोक :** म्हणून काय झालं ? थोडी लवकर आली असतीस तर कांहीं बिघडलं नसतं ! मी बघ-पांच वाजतांच इथं येऊन बसलों आहे ! कांहीं म्हण उषा, माझं हें घड्याळ फार बिघडत चाललं आहे. तुझी भेट होण्यापूर्वी तें हत्तीच्या गतीनं चालतं. तुझी भेट झाली रे झाली, कीं मग मात्र तें एकाद्या हरणाच्या वेगानं धावूं लागतं !

**उषा :** पुरे झालं हं ! गोड बोलण्यानं मी अशी फसायची नाहीं ! गेल्या आठवड्यांत माझी एकदां तरी आठवण झाली कां ? काय कामं असतात हो तुमच्यामागें एवढीं ? तुमची धावपळ पाहून एखाद्याला वाटेल कीं हा वेडाच आहे कुणीतरी !

**अशोक :** आणि असं वाटलं तर तें फारसं चूक होणार नाहीं ! आमचे महान् मित्र विनायकराव आणि तूं या दोघांच्या कचाट्यांत सापडला, तर ब्रह्मदेवसुद्धां वेडा होईल ! मग माझी काय कथा ?

**उषा :** मी ? मी काय केलं बाई तुम्हाला वेड लावण्यासारखं ?

**अशोक :** तूं काय केलंस ? तें तुला कधींही समजणार नाहीं ! सागराच्या हृदयांत विराट खळबळ उठाविणाऱ्या चंद्रिकेला तरी कुठें कल्पना असते, कीं आपण असं कांहींतरी करीत आहोंत म्हणून ?

**उषा :** हं! तुम्हाला वाटतं कीं, सागर, चंद्र, वेड अशा शब्दांची वारेमाप उधळपट्टी केली कीं आपला अपराध झांकला जाईल! पण ह्या मानभावी बोलण्यानं मी आतां कधीं फसायची नाहीं! मला माझ्या प्रश्नांचं उत्तर पाहिजे आहे! मी विचारतें, गेल्या आठवड्यांत माझी एकदां तरी आठवण झाली का तुम्हाला?

**अशोक :** गेल्या आठवड्यांत प्रत्येक क्षणाला मला तुझी आठवण होत होती!

**उषा :** खोटं—अगदीं खोटं!

**अशोक :** अगदीं खरं!

**उषा :** प्रत्येक क्षणाला माझी आठवण होत होती, तर मला भेटलां कां नाहींत हो?

**अशोक :** अग, प्रत्येक क्षणाला तुझी आठवण व्हावी म्हणूनच मी तुला भेटलों नाहीं! तुला भेटलों असतों तर मग तुझी आठवण करायचं कांहींच कारण उरलं नसतं!

**उषा :** ( हंसून ) पुरे झालं! तुमच्याकडून सरळ उत्तराची अपेक्षा करण्यांत अर्थ नाहीं!

**अशोक :** प्रेमाच्या साम्राज्यांत सरळ उत्तरांना महत्व नसतं उषा! प्रेमाचा प्रभात्र सरळ उत्तरांच्या अभावांतूनच मार्ग आक्रमीत असतो! उषा, तुला-तर सारं माहीत आहे. गेला आठवडा सुशीच्या लग्नाच्या वाटाघाटींनीं कसा गजबजून गेला होता. त्यामुळं तुला निवांत असं भेटायला मला फुरसतच झाली नाहीं!

**उषा :** खरंच, गेला आठवडा सगळ्यांच्या चांगला लक्षांत राहील काय एकेक प्रसंग—अगदीं नाटकांतल्यासारखे! तुमच्या प्रियतम मित्राचा पराक्रम अगदीं डोळ्यांत भरण्यासारखा झाला! काय बाई त्यांनीं देखावा केला हो त्या दिवशीं! काय तो वेष, काय तें बोलणं, काय तें वागणं! इश्श! आम्ही नव्हता बाई असा मनुष्य कधीं पाहिला!

**अशोक** : आणि त्या प्रसंगानंतर तूं माझ्यावर रागावलीस तो देखावा तरी काय कमी विलक्षण होता ? त्या दिवशीचा तुझा तो संताप आठवला म्हणजे अजूनहि माझ्या अंगाचा थरकाप होतो !

**उषा** : तर तर ! बरा होईल थरकाप ! आणि नाहींतरी त्या दिवशीचं तुमचं वागणंच तसं होतं ?

**अशोक** : माझं ? मी काय केलं बुवा ?

**उषा** : तुमच्या मित्राच्या विचित्र वागणुकीची जबाबदारी तुमच्यावरच येते.

**अशोक** : एकंदरीत माझ्यावरचा तुझा राग गेला नाहीं हेंच खरं ! नाहींतरी विनायकानं त्या दिवशीं अगदी कहर केला ! मी झालेल्या प्रकाराबद्दल बाबासाहेबांची क्षमा मागितली आणि त्यांनींही मोठ्या उदार मनानं त्यावर पडदा टाकला. उषा, तुझी सुद्धा मी पुन्हां एकदां क्षमा मागतों !

**उषा** : इश्श ! माझी कसली क्षमा ? वास्तविक सारी चूक माझीच आहे, तुमची नाहीं ! सगळ्या गोष्टी लक्षांत न घेतां मी तुम्हाला वाटेल तें बोललें ! त्याबद्दल तुम्हीच मला क्षमा करायला हवी अशोक ! करणार ना क्षमा मला ?

**अशोक** : ठीक आहे ! सारी चूक तुझीच आहे हें तुझं म्हणणं मला कबूल आहे ! बायका सुद्धा कधीं कधीं खरं बोलूं शकतात हें त्यावरून सिद्ध होतं ! तुझ्या क्षमेचा अर्ज मी मंजूर केला आहे !

**उषा** : कांहीं नाहीं ! माझी कांहीं चूक नाहीं ! सगळी चूक तुमचीच आहे–तुमचीच आहे !

( हातांत कागद-पेन्सील घेऊन विनायक आणि पाठोपाठ अण्णा एका बाजूनें प्रवेश करतात. एकमेकांना खुणा करीत, पाय न वाजवतां, ते लपण्यासाठीं दुसऱ्या बाजूला जातात.)

**अशोक** : आतां काय करावं बुवा ? तूं एकदा एक बोलतेस, नंतर दुसरंच बोलतेस !

**उषा :** प्रेमाच्या साम्राज्यांत सरळ बोलण्याला महत्व नाहीं असं तुम्हीच नाहीं कां सांगितलंत ? तुमच्यापासून सगळे धडे मला आतां घ्यायला हवेत ! कारण आपल्या लग्नाचा मंगल दिवस आतां अगदीं जवळ आला आहे. मनांत ठरवलेली तिथी बाबासाहेब कधीं टळूं देणार नाहींत. दिवाकर किंवा विनायक यांच्यापैकीं वाटेल तो मुलगा पसंत करण्याची त्यांनीं सुशिलेला मुभा दिली आहे. सुशीला आतां निर्णय लवकरच घ्यावा लागेल हें नक्की !

**अशोक :** तुझा निर्णय तरी पक्का आहे ना ? लग्न लागेपर्यंत जरा वचकूनच रहायला हवं !

**उषा :** माझा निर्णय ? तो मग सांगेन हं ! पण तें सांगण्यापूर्वी तुम्हाला एक फार फार आनंदाची बातमी सांगायची आहे. सांगूं ?

**अशोक :** हं सांग बघूं !

**उषा :** सांगू आनंदाची बातमी ? लग्न झाल्यानंतर आपण नवं घर केलं, कीं माझी एक मावस आत्या आपल्याकडे कांहीं महिने रहायला येणार आहे !

**अशोक :** बापरे ! तुला आनंद झाला हें ठीक आहे. पण माझ्यावर ही मोठी आपत्तीच आली म्हणायची !

**उषा :** आपत्ति ? कसली आपत्ति हो एवढी ?

**अशोक :** आपत्तीच नाहींतर काय ? नुकतंच लग्न झालेल्या राजाराणीच्या एकांतांत एखादी स्त्री अचानक येणं ही आपत्तीच नाहींतर काय ?

**उषा :** बरं बरं ! माझ्या माहेरचं कोणीहि माणूस आपल्या गोड एकांताचा भंग करणार नाहीं असं मी आश्वासन देतें. पण म्हटलं, हा नियम आपल्याकडच्या मंडळींनाही लागू आहे ! आहे ना ?

**अशोक :** अर्थात् ! हें सूर्य प्रकाशाइतकं स्पष्ट आहे. उषा, तुझे हे डोळे सुंदर आणि भावपूर्ण आहेत, हें जितकं स्पष्ट, तितकं तेंही स्पष्ट आहे !

**उषा :** पुरे ही साखर पेरणी ! तुम्ही फार फार लबाड आहांत अशोक ! लबाडी, लबाडी— इथून तिथून सारी लबाडी ! आपली पहिली भेट आठवतं

कां ? कुठलं तरी पुस्तक हवं आहे अशी खोटी सबब पुढें करून तुम्ही माझी ओळख करून घेतलीत. आठवतं ना ?

**अशोक :** खोटं बोललों नसतों, तर तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीची भेट तरी कशी होऊं शकली असती ? अग, सुंदर स्त्रीच्या भेटीसाठीं एकदांच काय, पण हजारदांही खोटं बोलायला हरकत नाहीं असं शास्त्रवचन आहे !

**उषा :** तर तर ! मोठे शास्त्रीबुवाच किनई तुम्ही शास्त्रांचे दाखले द्यायला ! ...चला बाई जाऊं घरीं आतां !... पण मी काय बरं तुम्हाला विचारणार होतें ? (आठवून) हो ! तुम्ही तुमच्या वडिलांना, भाऊसाहेबांना, कळवलंत का इथं यायला ? ते वाट पहात असतील तुमच्या पत्राची. तुमच्या वडिलांशीं माझी दोनदांच भेट झाली. पण त्यांच्या सुस्वभावाचा मला कधींहि विसर पडणार नाहीं ! किती समजुतदार, किती प्रेमळ !

**अशोक :** तुझ्या वडिलांबद्दलहि अगदी हेंच म्हणतां येईल. नाहीं कां ?

**उषा :** बाबा ? त्यांचं ऋण कुठल्या शब्दांत वर्णन करतां येईल ? आईविना असलेल्या आम्हा तिघी मुलींना त्यांनीं कांहीं कमी पडूं दिलं नाहीं, आमच्यासाठीं सतत जीव टाकला, जिवाचं रान केलं. आतां आम्ही तिघी एकदम त्यांना सोडून जाणार ! कसं वाटत असेल त्यांना ? त्याचा विचार करायला लागलं कीं कसं भडभडून येतं ! (डोळे पुसते) जाऊं द्या ! ह्या निर्भर आनंदाच्या वेळीं दुःखाश्रू कशाला ?

**अशोक :** पण कधींकधीं रडतांनाच बायका फार सुंदर दिसतात !

**उषा :** आणि म्हणूनच बायकांना रडवायची पुरुषांना कधीं कधीं लहर येते वाटतं ? मग आतां मी कध्धी रडणार नाहीं ! (आवेगानें) अशोक, मी सुखी आहे—फार सुखी आहे...तुमच्या प्रेमनगरीची मी राणी आहे... सगळीं सुखं मला कशीं बिलगलीं आहेत...चला अशोक, आपण पाखरांसारखं खूप खूप फिरूं...

(अशोक आणि उषा जातात. अंगावरील धुळ झाडीत अण्णा आणि विनायक बाहेर येतात.)

**विनायक :** काय अण्णा ? कशी मजा आहे ! घेतला होतां कां हा अनुभव कधीं ?

**अण्णा :** नाहीं बुवा ! फुकट तीन लग्नं केलीं मी !

**विनायक :** मग बरं ? बाकी अशोक प्रेमभाषेंत भलताच तरबेज आहे नाहीं ? तरी आपल्याला थोडा उशीर झाला यायला ! फारसं बिघडलं नाहीं म्हणा ! (कागद तोंडासमोर धरून) सहाच वाक्यं आहेत–पण एकेक वाक्य असं भावपूर्ण आहे, कीं त्यामुळं सुशीलाच काय, पण आकाशांतील सगळ्या तारकासुद्धां माझ्यावर मोहित होतील. किती छान युक्ति सुचली मला ! धन्य असो त्या परमेश्वराची, कीं ज्यानं माझ्यासारखा हुशार मनुष्य निर्माण केला. ह्यापैकीं कोणच्याही एकाच वाक्यानं सुशीला घायाळ होईल. मग ह्या सगळ्या वाक्यांनीं काय बरं स्थिती होईल तिची ? माझ्याकडे बोट दाखवून –नाथ हा माझा– असं ती साऱ्या जगाला ओरडून सांगेल ! बरं अण्णा, आपण रंगीत तालीम येथेंच उरकून टाकूं ! तुम्ही जरा सुशीला व्हा बरं !

**अण्णा :** गाढवा ! मला सुशीला व्हायला सांगतोस ? महामूर्ख कुठला !

**विनायक :** बरं बरं ! राहूं दे ! सुशीलेची सध्यां आवश्यकता नाहीं. अशोकचीं हीं वाक्यं रात्रीं पाठ करून टाकतों आणि सकाळीं एकामागून एक सुशीलेला ऐकवतों. (कागद तोंडासमोर धरून) पहिलं वाक्य– बापरे ! तुला आनंद झाला हे ठीक आहे. पण माझ्यावर ही मोठी आपत्तीच आली म्हणायची ! दुसरं वाक्य– दोन्ही हात खिशांत घालून (दोन्ही हात खिशांत घातल्यामुळें कागद खालीं पडतो) हो, हो ! सध्यां एकच हात खिशांत घातला तरी चालेल ! वेळेवर दोन्ही हात खिशांत घालतां येतील. दुसरं वाक्य— आपत्तीच नाहींतर काय ? नुकतंच लग्न झालेल्या राजाराणीच्या एकातांत एखादी स्त्री अचानक येणं, ही, आपत्तीच नाहींतर काय ? किती सुंदर वाक्य आहे. नाहीं अण्णा ? शाबास अशोक. तिसरं वाक्यं– अर्थात् हें सूर्यप्रकाशाइतकं स्पष्ट आहे !

उषा, तुझे हे डोळे सुंदर आणि मंत्रमुग्ध आहेत हें जितकं स्पष्ट तितकं तेही स्पष्ट आहे !

**अण्णा :** पण हें वाक्य म्हणतांना तूं सुशीला म्हण—उषा म्हणूं नकोस ! नाहीं तर होईल काय कीं—

**विनायक :** थांबा थांबा अण्णा ! मला एवढी साधी गोष्ट समजत कां नाहीं ? चवथं वाक्य— खोटं बोलणें नसतें तर तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीची भेट तरी कशी होऊं शकली असती ? अग, सुंदर स्त्रीच्या भेटासाठीं एकदांच काय, पण हजारदांही खोटं बोलायला हरकत नाहीं असं शास्त्रवचन आहे ! खरंच असं शास्त्रवचन आहे काहो अण्णा ?

**अण्णा :** अहो ! असं शास्त्रवचन म्हटलं तर आहे, म्हटलं तर नाहीं ! आहे म्हणायचं कारण असं कीं, स्मृतींत त्याला आधार आहे. पण श्रुतींत त्याला विरोध आहे, म्हणून नाहीं म्हणावं लागतं. आतां स्मृतींत त्याला आधार असूनही उपयोग नाहीं. कारण श्रुतीविरोधी स्मृतिवचनांना कांहींही महत्व नाहीं असं वेदवचन आहे !

**विनायक :** आहे आणि नाहीं—नाहीं आणि आहे ! ह्या दोन शब्दांखेरीज अण्णा, तुमच्या बोलण्यातलं एक अक्षर तुम्हांला तरी समजलं का हो ? बरं कुठवर आलं होतं ? बरोबर, पांचवं वाक्य—तुझ्या वडिलांबद्दलही अगदी हेंच म्हणतां येईल. नाहीं कां ?

**अण्णा :** पण सुशीलेला बाप नाहीं असं मी ऐकलं !

**विनायक :** असं कसं होईल अण्णा ? पुरुषांप्रमाणं प्रत्येक स्त्रीलाही बाप असतोच ! माझी साखळी नका बुवा तोडूं तुम्ही ! आणि सहावं वाक्यं म्हणजे अगदीं कळस आहे अण्णा ! सहावं वाक्यं-पण कधीं कधीं रडतानांच बायका फार सुंदर दिसतात ! बस्स ! हीं सगळीं वाक्यं आज रात्रीं पाठ करून टाकतो आणि उद्या सुशीला भेटली की तिला मंत्रमुग्ध करून टाकतों ! चला अण्णा लवकरच सुशीला माझी पत्नी होणार ! (कागदाची घडी घालून खिशांत ठेवतो) बरं पण अण्णा, माझ्या नोकरीचं काय झालं ?

**अण्णा :** मी कालच चंद्रप्रकाश लाकूड वखारीच्या मालकाला भेटलों. नेमणुकीचं पत्र उद्यांच तुझ्याकडे तो रवाना करणार आहे. उद्यांपासून झालास तूं चंद्रप्रकाश लाकूड वखारीचा व्यवस्थापक!

**विनायक :** अण्णा, तुम्ही माझ्यासाठीं फार श्रम घेतलेंत. अशोकनं मला बायको मिळवून दिली, तुम्हीं नोकरी मिळवून दिलींत? तुम्हां दोघांचा मी फार फार ऋणी आहे! (खिशातून कागद काढतो) पाहिलं वाक्यं......

(पडदा)

# : ३ :

## प्रवेश पहिला

[ नरेश वर्तमानपत्र चाळीत बसला आहे. तो कधीं वर्तमानपत्रांत तोंड खुपसतो तर कधीं वर्तमानपत्र बाजूला सारून विचारांत निमग्न होतो. कांहीं वेळानें घाईघाईनें निशा प्रवेश करते. ]

**निशा** : (नाटकी, घाबऱ्या स्वरांत) काय झालं? काय झालं नरेश? सांगा लवकर—अगदीं लवकर!

**नरेश** : ( वर्तमानपत्र दूर टाकून ) कुठं काय झालं?

**निशा** : म्हणजे? ताबडतोब येऊन भेट असा निरोप तुम्हीच मला पाठवलांत ना?

**नरेश** : ( हंसत ) ह्याचा अर्थ कांहीं भयंकर झालं असा होत नाहीं!

**निशा** : नाहीं ना? मग सुटलें बाई मी! तुमचा निरोप पोंचल्याबरोबर मी एखाद्या वेड्यासारखी धांवत सुटलें. अजून सुद्धां छाती धडधडते आहे माझी! मला वाटलं माझे नरेश नक्की गौतमबुद्धासारखे मला सोडून जाणार! काय नेम सांगावा बाई!

**नरेश :** तुझ्यासारखी बायको मिळाली असती तर बुद्धसुद्धां अरण्यांत गेला नसतां ! मग माझ्यासारख्याची काय कथा !

**निशा :** ( बसते ) नरेश, एक विचारूं का ?

**नरेश :** प्रस्तावनेची एवढी गरज वाटली ?

**निशा :** नरेश, तुम्हाला हल्ली झालं आहे तरी काय ?

**नरेश :** तुझ्या प्रश्नाचा रोख नाहीं समजलों मी ?

**निशा :** सांगू ? अलीकडे तुम्ही अस्वस्थ फार दिसतां. तुमच्या डोक्यांत कांहींतरी खळबळ चालली असावी, असं सारखं मला वाटतं. कसले तरी गहन विचार तुमच्या डोक्यांत घोळताहेत. माझ्या मावस मावशीचा नवरा माहीत आहे तुम्हाला ? तो नेहमी विचार करायचा, कीं परमेश्वरानं हें जग निर्माण कां केलं, कसं केलं आणि ह्या जगाचा शेवटीं अंत कसा होणार ! त्याच्या शंकांचं समाधान करण्याचा माझ्या मावशीनं खूप प्रयत्न केला. पण त्याचं समाधान कांहीं झालं नाहीं आणि एक दिवशीं जो तो पळून गेला तो गेलाच.

**नरेश :** बरोबर आहे. तुझ्या मावशीनं त्याच्या शंकांचं समाधान करण्याचा प्रयत्न केला. म्हणूनच तो पळून गेला. भलता उद्योग कोणीं सांगितला होता तुझ्या मावशीला हा ?

**निशा :** वेडी होती बिचारी ती माझ्यासारखी !

**नरेश :** म्हणजे, स्वतःच्या वेडेपणाची जाणिव तुला आहे तर.

**निशा :** आहे तर ! प्रेमांत पडलेली माणसं वेडीच असतात. पण सांगा ना—कसला विचार करीत असतां हल्ली तुम्ही एवढा ?

**नरेश :** लग्नाचा दिवस जवळजवळ येत चालल्यामुळें माझ्या मनांतला प्रक्षोभ वाढत चालला आहे.

**निशा :** चला ! कांहीं तरी सांगता तुम्ही ! अशा लपवालपवीनं मी कधीं फसायची नाहीं.

नरेशः खरंच !

निशा : काय खरंच !

नरेश : लग्न जवळ येत चाललं आणि तुझं माझ्यावरचं प्रेम तर कमी होत चाललं! ह्यामधून मार्ग कसा काढायचा, ह्याचाच विचार करीत असतों मी.

निशा : ( रागानं ) नरेश ! अशी थट्टा नाहीं हं आवडणार मला.

नरेश : ( हंसून ) थट्टा नाहीं हीं !

निशा : माझं प्रेम कमी झालं आहे, असं तुम्हाला वाटायं असं मी काय केलं आहे तें सांगा बघूं ? असं बोलवतं तरी कसं तुम्हांला ? सांगा–सांगा काय केलं आहे मी तें ?

नरेश : तूंच आठवण कर .

निशा : मला कांहीं आठवत नाहीं हो ! लहानपणापासून मी ही अशीच मठ्ठ आहे !

नरेश : तरी बरं, सगळें लोक तुझ्या हुशारीची तारीफ करतात.

निशा : मठ्ठ माणसांची लोक नेहमीच हुशार म्हणून तारीफ करीत असतात ! विषय नका गडे बदलूं तुम्ही. सांगा ना मी काय केलं तें ?

नरेश : निशे , तूं कांहीं केलं नाहींस. मी सहज थट्टा केली तुझी . तुझ्या निर्व्याज प्रेमाची मला पूर्ण खात्री आहे. पण–

निशा : हा पणच मला फार वाईट आहे. आपल्या दोघांत सारखा घुटमळतो. तो तुम्ही मला एकदां दाखवा, म्हणजे मी त्याच डोकंच ठेचतें ! हं सांगा ना हा पण काय आहे तें ?

नरेश : सांगूं ?

निशा : हं

नरेश : मीं तुला एक काम सांगितलं होतं तें आठवतं कां ?

निशा : हो ! आठवतं कीं !

**नरेश** : मग केलंस काम तें तूं?

**निशा** : हो! केलं!

**नरेश** : कुठलं काम?

**निशा** : तुम्ही म्हणतां तें- तें!

**नरेश** : मी कुठलं म्हणतों?

**निशा** : ते मला काय माहीत बाई! (नरेश हंसतो)

**नरेश** : तूं फार लबाड आहेस निशा. एखादी गोष्ट तुला करायची नसली तर तूं ती कांहीं केल्या करणार नाहींस. हें बघ, सुशीचं मन दिवाकराच्या बाजूनें वळविण्याची कामगिरी मी तुझ्यावर सोंपवली होती पण तूं त्या दिशेनें कांहींच प्रयत्न केलेले दिसत नाहींत. दिवाकरांकडें ढुंकूनही बघायला सुशी तयार नाही आणि विनायकाचं नांव घेतलं कीं मात्र तिची कळी खुलते. मग तूं इतके दिवस केलंस तरी काय?

**निशा** : अहो, दिवाकरांबद्दल मी तिच्यापुढं एक मोठं व्याख्यान दिलं. पण ती ऐकत नाहीं त्याला मी काय करूं? आणि मी म्हणतें, सुशीवर असं दडपण आणणं तरी बरं का? लग्न तिचं आहे. तिलाच काय तें ठरवूं द्या! मीं आणि उषेनं ठरवलं आहे, कीं ह्या बाबतींत सुशीवर कुठलंही दडपण आणायचं नाहीं. ( थांबून ) मला ठाऊक आहे!

**नरेश** : काय ठाऊक आहे?

**निशा** : तुमच्या मनांत हल्ली सारखे विचार चालले असतात ते दिवाकरचेच? त्या ठोकळ्याला तुम्ही आपलं उगीचच इकडून तिकडे अन् तिकडून इकडे नाचवतां आहांत. दुसरं तुम्हांला हल्लीं कांहीं सुचतच नाहीं. दिवाकरांचं लोढणं एकदां सुशीच्या गळ्यांत कधीं अडकवूं असं झालं आहे तुम्हांला. नाहीं तुम्हाला कोणाशीं बोलण्याला फुरसत, नाहीं कोणाबरोबर फिरायला फुरसत. खरं म्हणजे माझ्यावरचं तुमचंच प्रेम कमी होत चाललं आहे!

**नरेश** : निशा, तुला असं बोलवतं तरी कसं?

**निशा** : आणि मघां? मघां कोण बोललं असं?

**नरेश** : (हंसून) बरं! आतां फिटफांट झाली!

**निशा** : आतां कोणी कोणावर असे आरोप करायचे नाहींत.

**नरेश** : कबूल–एकदम कबूल.

**निशा** : (नाटकी स्वरांत) आतां आपण आपल्या पूर्वीच्या विषयाकडे वळूं या! (साध्या स्वरांत) नरेश, मी म्हणतें तुम्ही कशाला हा आटापिटा चालवला आहे हो एवढा?

**नरेश** : कसला आटापिटा?

**निशा** : दिवाकरांचं सुशीशीं लग्न लावून देण्याचा!

**नरेश** : कां? त्यांत काय वाईट आहे?

**निशा** : कारण त्यांतून निष्पन्न तर कांहीं व्हायचं नाहीं. उलट तुमची फजिती मात्र व्हायची शेवटीं!

**नरेश** : झाली तर झाली! फजिती झाली तर तूं येशील ना मला सावरायला!

**निशा** : हो! एकदां सोडून हजारदां!

**नरेश** : मग माझी हजारदां फजिती झाली तरी हरकत नाहीं. तुझ्यासारखी हुशार मैत्रीण असल्यावर मला कसली काळजी? निशे, माझी ही मैत्रीण माझी पत्नी कधीं होईल असं झालं आहे मला.

**निशा** : तुमच्या मैत्रिणीला तुमचा निरोप सांगेन हं मी नक्की!

**नरेश** : सांग निशा! किती दिवस अवकाश आहे आपल्या लग्नाला अजून?

**निशा** : सांगूं?

**नरेश** : हं!

**निशा** : फक्त आठ दिवस!

**नरेश** : खरंच? आठ दिवसांनीं निशा माझी होणार!

**निशा :** आणि नरेश माझे होणार! हें आठ दिवस एकाच दिवसांत संपून गेले तर किती बरं होईल नाहीं? पण तसं कुठलं व्हायला? पण हेंच दिवस आपल्या लग्नानंतर भराभर पळूं लागतील. ( दिवाकर प्रवेश करतो )

**दिवाकर :** कोण पळालं?

**निशा :** अजून कोणी पळालं नाहीं, सेनापतीसाहेब! पण आतां मात्र मीच येथून पळतें. बरं आहे नरेश—संध्याकाळीं घरीं येणार?

**नरेश :** नक्की!

**निशा :** नक्की या हं! मी वाट पाहतें. ( नरेश दारापर्यंत तिला पोंचवायला जातो आणि पुन्हां येऊन खुर्चीवर बसतो )

**नरेश :** बसा–बसा, दिवाकर! उभे कां?

**दिवाकर :** ( बसतांना ) कोण पळालं?

**नरेश :** कोणी पळालं नाहीं दिवाकर!

**दिवाकर :** मला वाटलं, कोणीतरी पळालं!

**नरेश :** दिवाकर, परिस्थिती एकंदरींत फार आणीबाणीची आहे!

**दिवाकर :** परिस्थिती आणीबाणीची असेल तर ताबडतोब लष्करी कायदा पुकारला पाहिजे!

**नरेश :** लष्करी कायद्याचा ह्या ठिकाणीं उपयोग नाहीं दिवाकर! आतां डोकंच लढवायला पाहिजे. बाबासाहेबांपुढें त्या दिवशीं विनायकानं जो फार्स केला, त्यामुळं तुमचा मार्ग सुकर झाला असं मला वाटलं. पण तें सगळंच चूक ठरलं. अशोकानं बाबासाहेबांची समजूत घातली आणि बाबासाहेबांचंही समाधान झालं. सुशीलेचं मन तुमच्याबद्दल अगदीं कोरडं ठणठणीत आहे. उलट विनायकाबद्दल मात्र तिला बरीच आपुलकी वाटायला लागली आहे. आपण स्वस्थ बसलों तर विनायक–सुशीलेचं लग्न ठरणार हें नक्की! वेळ तर आतां फार थोडा उरला आहे. जें काय करायचं तें फार झटपट करायला हवं!

**दिवाकर :** काय करायचं?

**नरेश :** दिवाकर, मी एक व्यूह रचला आहे. हा व्यूह सिद्धीस गेला तर सुशीला निश्चित तुम्हाला मिळेल. आहे तयारी?

**दिवाकर :** अगदीं एका पायावर तयार आहे मी!

**नरेश :** तुम्ही थोडी हुशारी आणि सावधगिरी दाखवलींत, तर आपला हा व्यूह यशस्वी झालाच म्हणून समजा. थोडक्यांत म्हणजे आपल्याला एक नाटकच करावं लागेल. हा पोशाख बदलून आपल्याला खेडूतांचा पोशाख करावा लागेल. एक पागोटं, एक बंडी आणि मळकं धोतर. नांवंही बदलावीं लागतील आपल्याला. सोंगं अशी बेमालूम झालीं पाहिजेत, कीं कुणाला संशय येतां कामा नये! दिवाकर, तुम्ही काळजी करूं नका. सुशीलेशी शेवटीं तुमचंच लग्न होणार!

**दिवाकर :** खरं सांगूं का नरेश, मला ती काळजी कधीं वाटली नाहीं! सुशीलेला जेव्हां मी प्रथम पाहिलं, तेव्हांच माझी खात्रीं पटली, कीं ही माझी पत्नी होणार!

**नरेश :** ( उठून ) आणि ती तुमचीच पत्नी होणार याबद्दल मलाही शंका नाहीं. चला, आतां आपण एखाद्या निवांत जागीं फिरायला जाऊं. तेथें माझा व्यूह मी तुम्हाला नीट समजावून सांगतों. म्हणजे वेळेवर तुमचा घोटाळा व्हायला नको.

( जातात. पडदा )

# प्रवेश दुसरा

[ सकाळची वेळ. विनायक बागेंत सुशीलेची मार्गप्रतीक्षा करीत आहे. ]

**विनायक :** ज्या क्षणाची मी कालपासून आतुरतेनें वाट पाहत आहे तो सुवर्णक्षण आतां अगदीं जवळ येऊन ठेपला आहे. जिच्या नेत्रांत सदैव चांदणं फुललेलं आहे, जिच्या हालचालींमध्यें अवीट गोडवा भरलेला आहे, जिच्या शब्दाशब्दांमधून माधुर्याचा शिडकाव होत असतो ती सुशीला—माझ्या हृदयांतली प्रीतिदेवता—माझी भावी पत्नी, आतां थोड्याच वेळांत ह्या ठिकाणीं अवतीर्ण होईल. आकाशांतल्या गंधर्वांनो आणि अप्सरांनो! आमचा हा पहिला प्रीति-संवाद नीट ऐका—हृदयाचे कान करून ऐका. तुमच्याजवळ कागद पेन्सील असल्यास लिहून घ्या! तुम्हाला त्याचा उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं! आज माझं आणि सुशीलेचं मधुर मीलन होणार! जगांच्या इतिहासांत आजचा दिवस निःसंशय सुवर्णाक्षरानें लिहावा लागेल. माझं लग्न लांबणीवर पडलं म्हणून मी परमेश्वराला दोष देत होतों. पण सुशीलेसारखी गुणसंपन्न पत्नी मला लाभावी म्हणूनच परमेश्वरानं माझं लग्न लांबवलं. परमेश्वरा, झाल्या गेल्या गोष्टी विसरून जा! चूकभूल द्यावी घ्यावी! सुशीला, तूं कधीं बरं येणार? माझी प्रीतिदेवता मला ह्या ठिकाणीं किती वेळ बरं तातकळत ठेवणार? सुशीला, तूं आल्याबरोबर मधुर शब्दांनीं मी तुला एका क्षणांत माझी करून टाकतों. मात्र हें मधुर शब्द चोरलेले आहेत हें मी तुला कधीं कळूं देणार नाहीं. मी, परमेश्वर आणि अण्णा ह्या तिघांखेरीज हें गोड गुपित कोणालाच ठाऊक नाहीं. सगळीं वाक्यं कशीं तोंडपाठ झालीं आहेत माझीं! पहिलं वाक्यं—बापरे! तुला आनंद झाला हें ठीक आहे

पण माझ्यावर ही मोठी आपत्तीच आली म्हणायची! दुसरं वाक्यं–आपत्तीच नाहीं तर काय? नुकतंच लग्न झालेल्या राजाराणीच्या एकांतांत एखादी स्त्री अचानक येणं ही आपत्तीच नाहीं तर काय? तिसरं वाक्यं–अर्थात्! हें सूर्यप्रकाइतकं स्पष्ट आहे! सुशीला, तुझे हे डोळे सुंदर आणि भावपूर्ण आहेत हें जितकं स्पष्ट तितकं तेंही स्पष्ट आहे! चवथं वाक्यं–खोटं बोलल नसतो तर तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीचा भेट तरी होऊं शकली असती? अग, सुंदर स्त्रीच्या भेटीसाठीं एकदांच काय पण हजारदांही खोटं बोलायला हरकत नाहीं, असं शास्त्रवचन आहे! पाचवं वाक्य–तुझ्या वडिलाबद्दलही अगदीं हेंच म्हणतां येईल, नाहीं कां? सहावं वाक्यं–पण कधीं कधीं रडतांनाच बायका फार सुंदर दिसतात! सगळीं वाक्यं अगदीं तोंडपाठ झालीं आहेत. हीं वाक्यं मी उच्चारायचाच अवकाश, कीं सुशीलेचं हृदय माझ्याबद्दलच्या अनिवार प्रेमानें काठोकाठ भरून जाईल! अरे पण आलीच वाटतं ती? आली–कसो-टीची वेळ आली! विनायक, घाबरूं नकोस–घाबरूं नकोस! (सुशीला सुहास्य मुद्रेनें प्रवेश करते. विनायक गोंधळतो आणि उगीचच कपडे नीट करूं लागतो. कांहीं वेळ स्तब्धता. दोघं एकमेकांकडे चोरून पाहतात. शेवटीं सुशीला हळूहळू पुढें येते.)

**सुशीला :** विनायक!

**विनायक :** (दचकल्यासारखं) ओ? हो! मीच तो! मीच विनायक महादेव देशपांडे!

**सुशीला :** (हंसून) मला माहीत आहे. (पुन्हा स्तब्धता सुशीला इकडे तिकडे बघते. तेवढ्यांत खिशांतून कागद काढून विनायक त्यावरून दृष्टी फिरवतो आणि पुन्हा घाईघाईनें कागद खिशांत कोंबतो.)

**सुशीला :** (स्तब्धतेचा भंग करीत) तुमची भेट झाल्यामुळं मला किती आनंद झाला म्हणून सांगूं! खरंच, फार फार आनंद झाला मला!

**विनायक :** बाप रे! तुला आनंद झाला हें ठीक आहे, पण माझ्यावर ही

मोठी आपत्तीच आली म्हणायची!

**सुशीला :** (चकित होऊन, उद्विग्नतेनें) आपत्ति? काय एकतें मी हें? माझी भेट तुम्हाला आपत्ति वाटते? आपत्ति वाटते?

**विनायक :** आपत्तीच नाहीं तर काय? नुकतंच लग्न झालेल्या राजाराणीच्या एकांतांत एखादी स्त्री अचानक येणं, ही आपत्तीच नाहीं तर काय?

**सुशीला :** (व्याकुळतेनें) काय म्हणतां? राजाराणीच्या एकांतांत मी आलें? राजाराणीचा एकांत!! म्हणजे... म्हणजे, तुमचं लग्न झालं आहे! लग्न झालं आहे तुमचं?

**विनायक :** अर्थात्! हें सूर्यप्रकाशाइतकं स्पष्ट आहे. सुशीला, तुझे हे डोळे सुंदर आणि भावपूर्ण आहेत हे जितकं स्पष्ट, तितकंच तेंही स्पष्ट आहे.

**सुशीला :** खबरदार वाटेल तें बोलाल तर! (आवेगानें) अशोकांनीं मला सांगितलेलं सारं खोटं आहे तर! अशोकांनीं मला खोटं सांगितलं? नाहीं, नाहीं असं कधीं व्हायचं नाहीं! तुम्हीच, तुम्हीच त्यांना स्वतःच लग्न झाल्याचं सांगितलं नाहीं! तुम्ही त्यांना फसवलंत—तुम्ही त्यांना खोटं सांगितलंत! कां, कां खोटं सांगितलंत तुम्ही त्यांना?

**विनायक :** खोटं बोललों नसतो तर तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीची भेट तरी कशी होऊं शकली असती? अग, सुंदर स्त्रीच्या भेटीसाठीं एकदांच काय पण हजारदांही खोटं बोलायला हरकत नाहीं असं शास्त्रवचन आहे!

**सुशीला :** तुम्ही मनुष्य आहांत कीं कोण आहांत? स्वतःचं लग्न झालेलं असतांना, लग्न झालं नाहीं असं सांगून अशोकांना फसवलंत, मला इथं यायला लावलंत आणि वर आचरटासारखं वाटेल तें बोलतां? नीचपणाचा हा कळस झाला! तुमचं हृदय कसायाचं आहे—कसायाचं आहे!

**विनायक :** तुझ्या वडिलांबद्दलहि अगदीं हेंच म्हणतां येईल. नाहीं का?

**सुशीला :** (संतापानें) तुमच्या जिभेला कांहीं हाड तरी आहे का? स्वतः निर्लज्जासारखी करणी करून वर पुन्हां माझ्या वडिलांचा उद्धार करतां?

माझ्या वडिलांना कधीं पहायला आला होता तुम्ही ?...काय केलंत, काय केलंत अशोक, तुम्ही हें! तुम्ही नीट तपास केला नाहीं, चौकशी केली नाहीं! कुठल्या माणसाची भेट घ्यायला लावलीत तुम्ही मला! ह्या नीच माणसानं माझ्या स्वर्गस्थ वडिलांचासुद्धां अपमान केला! कशाला-कशाला आले मी इथं? (हुंदके देते)

**विनायक :** पण कधीं कधीं रडतांनाच बायका फार सुंदर दिसतात!

**सुशिला :** (खवळून) चूप रहा! नाहींतर दगडानं मी तुमचा कपाळमोक्ष केल्याशिवाय राहाणार नाहीं. मी स्त्री असलें तरी नीच माणसाला शासन करण्याइतकं सामर्थ्य परमेश्वरानं प्रत्येक स्त्रीला दिलं आहे हें विसरूं नका! आतां एखादा शब्द तोंडातून बाहेर काढाल तर तुमचं अभद्र तोंड मी दगडानं ठेचल्याशिवाय राहणार नाहीं!

(सुशीला जाऊं लागते. विनायक हताश मुद्रेनें तिच्याकडे पाहूं लागतो.)

**विनायक :** अहो! थोड्या थांबा! (सुशीला थांबते) माझी कांहीं चूक झाली का? क्षमा करा-पण ह्या रागाचं, संतापाचं कारण तरी काय? मला वाटलं, तुम्हीसुद्धां प्रेमभाषेंत बोलत आहांत!

**सुशीला :** वर आणखी हें विचारायला तुम्हाला कांहींच कसं वाटत नाहीं? तुम्ही मनुष्य आहांत कीं सैतान आहांत? आहांत तरी कोण?

**विनायक :** मी-मी विनायक महादेव देशपांडे आहे!

**सुशीला :** विनायक महादेव देशपांडे! माणसाचं नांव आहे म्हणून तुम्हाला माणूस म्हणायचं! मला फसवून येथें यायला लावलंत ते लावलंत आणि वर वाटेल तीं मुक्ताफळं उधळतां!

**विनायक :** अहो, खरंच सांगतों, ही खऱ्याखुऱ्या प्रेमसंवादातील मुक्ताफळं आहेत! हा बघा कागद-म्हणजे तुमची खात्री होईल!

(सुशीलेच्या हातांत कागद देतो. वाचत असतांना सुशीलेच्या मुद्रेवरील रागाचे भाव नाहींसे होऊं लागतात.

**सुशीला :** म्हणजे? आहे काय प्रकार हा?

**विनायक :** सांगूं? मला प्रेमभाषा ठाऊक नाहीं. म्हणून तुमच्याशीं बोलायला उपयोगी पडावा म्हणून खराखुरा प्रेमसंवाद मी चोरून ऐकला. काल संध्याकाळीं ह्याच जागेवर अशोक आणि उषा प्रेमाच्या गोष्टी करीत होते तेव्हां मी अशोकचीं वाक्यं लिहून घेतलीं ह्या कागदावर. ( सुशीला हसूं लागते ) आणि ह्याच वाक्याचा तुमच्याशी बोलतांना मी उपयोग केला. (सुशीलेचें हसूं अनावर होते.) मला वाटलं तुम्ही माझ्यावर त्यामुळं प्रेम कराल, पण तुम्ही तर मला दगडानं ठेचायला निघाल्या! प्रेम ही भानगड फार वाईट दिसते एकंदरीत! (सुशीला मोठ्यानें हंसते, विनायकही हंसतो.)

**सुशीला :** पण काहो, अशोक–उषेचा संवाद चोरून ऐकातांना तुम्हाला कांहींच कसं वाटलं नाहीं?

**विनायक :** वा, वा! असं कसं होईल? मला फार गुदगुल्या होत होत्या त्यावेळीं!

**सुशीला :** इश्श! माझ्या विचारण्याचा अर्थ तसा नाहीं! मी म्हणतें, अशोक–उषेचा संवाद तुम्ही चोरून ऐकलांत तरी कसा?

**विनायक :** दगडाआड लपून! ( बोट दाखवून ) त्या दगडाआड लपून मी तो संवाद ऐकला! तो दगड तसा फार चांगला आहे!

**सुशीला :** शर्थ झाली बाई तुमच्यापुढें! अहो, मी म्हणतें, असा प्रेमसंवाद चोरून ऐकणं बरं कां? किती वाईट गोष्ट केलींत तुम्ही! बरं चोरून ऐकलंत तें ऐकलंत आणि वर अशोकांची वाक्यं, त्यांचा संदर्भ लक्षांत न घेतां, बेधडक माझ्या तोंडावर फेकलींत! ( हंसते ) किती विचित्र आहांत हो तुम्ही विनायक!

**विनायक :** तुमचा माझ्यावरचा राग गेला?

**सुशीला :** राग गेला! खरंच तुम्ही फार विचित्र आहांत! आणि मी म्हणतें, हें तुम्ही सांर करतां तरी कशासाठीं? तुमचा हेतू तरी काय आहे

ह्या सगळयांमागें ?

**विनायक :** सांगूं ? तुम्ही पुन्हा पहिल्याप्रमाणं रागावणार तर नाहीं ना ? खरं म्हणजे मघाचं तुमचं रौद्र स्वरूप पाहून मला तुमची फार भीति वाटायला लागली आहे !

**सुशीला :** विनायक, मला क्षमा करा ! पण माझी तरी काय चूक बरं ? तुमच्या बोलण्यानं सारा घोटाळा झाला ! सांगा बघूं ! कशासाठीं एवढे उद्योग चालले आहेत तुमचे हे !

**विनायक :** सांगूं ? खरं ?

**सुशीला :** खरंच सांगा !

**विनायक :** तुमचं प्रेम संपादन करण्यासाठीं– तुम्हाला जिंकण्यासाठीं माझी ही सारी धडपड चालली आहे ! ( सुशीला लाजून खालीं पाहूं लागते. )

**सुशीला :** विनायक–

**विनायक :** सुशीला ?

**सुशीला :** विनायक, तुम्हाला खरं सांगूं ?

**विनायक :** सांगा– अगदीं खरं सांगा !

**सुशीला :** कसं सांगूं तुम्हाला ? माझ्या मनानं सारखा तुमचा ध्यास घेतला आहे ! मी तुमच्यावर प्रेम करतें, फार फार प्रेम करतें, विनायक !

**विनायक :** ( उचंबळून ) हो ना ? तरी मला पहिल्यापासून संशय येत होता !

**सुशीला :** ( हंसून ) पण आतां तरी संशयनिवृत्ती होऊन खात्री पटली गा !

**विनायक :** खात्री पटली– ओळख पटली ! सुशीला, तूं माझी आहेस, तूं माझी सुशी आहेस ! तुझ्यासाठीं मी जिवाचं रान केलं, तुझ्यासाठीं, केवळ तुझ्या प्राप्तीसाठीं मी निरनिराळे व्यूह रचले, त्या सगळयांचं आज सार्थक झालं. किती किती चांगली आहेस तूं ! सुशे, आपलं लग्न झाल्या–बरोबर मी तुझं नांव काय ठेवणार आहे ठाऊक ?

**सुशीला :** काय ?

**विनायक :** मी तुझं नांव वीणा ठेवणार आहे! विनायकाची वीण आवडेल ना तुला हें नांव ?

**सुशीला :** तुम्ही ठेवलेलं कुठलंहि नांव मला आवडेल!

**विनायक :** सुशे, लग्न झाल्याबरोबर आपण आपलं नवं घर थाटूं. ल फक्त तूं आणि मी, मी आणि तूं– बाकीच्यांना मज्जाव! अर्थात अधूनम अशोकला आणि अण्णांना आपल्या घरांत यायचा लेखी परवाना दे ठेवूं त्या दोघांनीं माझ्यासाठीं फार फार श्रम घेतले. एकानं मला बा दिली, दुसऱ्यानं मला नोकरी दिली.

**सुशीला :** तूम्हाला नोकरी मिळाली ? खरंच ? कारण नोकरी नसली बाबासाहेब आपल्या लग्नाला कधीं संमति देणार नाहींत. कुठं मिळ नोकरी ?

**विनायक :** आजपासून चंद्रप्रकाश लाकूड वखार ह्या संस्थेचा व्यवस्थापक झालों आहे.

**सुशीला :** किती छान झालं! आतां आपल्या लग्नाला कसलीही आड उरली नाहीं. आपलं मधुर स्वप्न साकार म्हायला आतां कसलीही अड राहिली नाहीं!

**विनायक :** चंद्रप्रकाश लाकूड वखारीचा व्यवस्थापक– केवढी मोठी ज मिळाली मला. मधून मधून मी त्या वखारीतून लाकडं लांबवीत ज म्हणजे आपल्या स्वैपाकाची तरी काळजी नको!

**सुशीला :** इश्श! लाकडं तीं काय मेली आणि तीं कशाला लांबवा पाहिजेत ? असे लांबवायचे प्रकार नाहीं करायचे हं! आपण गडे काटकस र हूं पण हें असे लांबवायचे प्रकार मनात सुद्धां आणायचे नाहींत! नाह आणणार ?

**विनायक :** अग वेडे, लांबवायचीं म्हणजे रोख पैसे टिकवून लांबवाय

वाटेल तितकी लाकडं आणून देईन तुला मी– मग कधी जिलबी, कधी पुरणपोळी, कधी बासुंदी करीत रहा तूं आपली!

**सुशीला :** बरं, बरं, तुम्हाला सारं करून खायला घालीन मी. मी तुम्हाला कांहीं कमी पडूं देणार नाहीं कधीं. अगदी फुलासारखी काळजी घेईन विनायक तुमची मी.

**विनायक :** सुशे, हें स्वप्न तर नव्हे ना? नाहीं, हें सत्यच आहे––स्वप्न नाहीं! जी तूं स्वतःच फुलासारखी कोमल आहेस, ती तूं माझी फुलासारखी काळजी घेणार—हें माझं भाग्यं पाहून स्वर्गातील देव सुद्धा माझा हेवा करीत असतील. ना मला भाऊ ना बहीण, ना आई ना बाप. एखाद्या वैराण वाळवंटात हिंडणाऱ्या मुशाफिरासारखी माझी स्थिती झाली होती. पण ती दुर्दशा आज संपली. वैराण वाळवंटाचं रूपांतर तूं—तूं वैभवशाली नंदनवनांत केलंस. जगांत कोणाच्याहि वाट्यास आला नसेल असा भकासपणा मी अनुभवला; जगांत कोणीहि अनुभवला नसेल असा मधुर सहवास आतां माझ्या वाट्यास येणार! माझ्या आनंदाला आतां सीमा उरल्या नाहींत, माझ्या ह्या अनिवार आनंदाला मी वाचा तरी कशी फोडूं? शद्बांची सारी सृष्टी मला आतां अपुरी वाटायला लागली आहे. मी माझ्या भावना तुला कशा समजावूं?

**सुशीला :** विनायक, न सांगतांही तुमचं प्रेम मला समजतं, खुलवतं. तुमचं प्रेम ही माझी अमोल दौलत आहे. ह्या अमोल दौलतीची मी स्वामिनी झालें केवढं माझं भाग्य! तुमच्या नोकरीबद्दल मला धाकधूक वाटत होती, पण तीहि आतां नाहींशी झाला. कारण, नोकरी नसलेल्या मुलाला मी मुलगी कधीं देणार नाहीं असं बाबा नेहमी म्हणतात.

**विनायक :** नाहीं तरी, आहे म्हातारा चक्रमच!

**सुशीला :** विनायक! असं बोलवतं तरी कसं तुम्हाला?

**विनायक :** नाहीं, चक्रम म्हणजे तापट ह्या अर्थी मी म्हटलं! तापट असले तरी बाबासाहेबांचं हृदय केळासारखं कोमल आहे.

**सुशीला :** फार फार चांगले आहेत बाबा आमचे. अनंत जन्म घेऊन त्यांची सेवा केली तरी त्यांचे उपकार फिटणार नाहींत. मी कोणचं स्थळ पसंत करावं ह्याचा निर्णयसुद्धां त्यांनीं सर्वस्वी माझ्यावर सोपवला आहे. विनायक, बाबांनीं निर्णय विचारल्याबरोबर त्यांना मी तुमचं नांव सांगेन. जायला पाहिजे मला आतां. मला घरापर्यंत पोंचवायला येणार ?

**विनायक :** घरापर्यंतच ? स्वैपाकघरापर्यंत तुला मी पोंचवून देतों—चल !

**सुशीला :** स्वैपाकघरापर्यंत नको हं ! उषा निशा थट्टा करून नकोसं करून टाकतील मला !

( जातात पडदा )

## प्रवेश तिसरा

[ एक रहदारीचा रस्ता. लोक येत जात आहेत. नरेश आणि दिवाकर खेडुतांचा पोशाख करून एका बाजूला उभे राहिले आहेत. ]

**नरेश :** मग आलं लक्षांत काय करायचं तें दिवाकर ? मारामारी करायची समजलं ना ?

**दिवाकर :** मारामारी करायची ! हें मला सांगायला का पाहिजे नरेश ? युद्ध म्हणजे तरी काय, एक मोठी मारामारीच. अर्थात् युद्ध खेळलेल्यांना मारामारी कशी करायची हें सांगायला नको.

**नरेश :** मेहेरबान, पण ही खोटी मारामारी आहे हें लक्षांत ठेवा. नाहीं तर माझा खरोखरच गळा दाबाल. दिवाकर, मारामारी खोटी; पण ती खोटी आहे असं विनायकाला वाटतां कामा नये. सुशीला आपल्याला मिळणार ह्या कल्पनेंमुळं विनायक इतका बेहोश झाला आहे कीं, त्याला आपली ही सोंगं कळण्याचा संभव नाहीं. पण असं असलं तरी योग्य ती खबदारी आपण घेतली पाहिजे. पुन्हा एकदा आपला बेत थोडक्यांत मी तुम्हाला सांगतों. विनायक येतांना दिसला कीं आपण मारामारी करायला सुरवात करायची, चार लोक जमवायचे. तो नक्की मारामारी सोडवायला येईल. तो मध्यें पडला कीं मारामारी बंद करायची. पुढं काय करायचं तें मी पहून घेईन—तुम्ही आपले स्तब्ध रहा. आलं ना लक्षांत ? बरं, तुमचं नांव आहे ना लक्षांत तुमच्या ?

**दिवाकर :** वा ! नांव कसं विसरेन मी ?

**नरेश :** काय नांव तुमचं ?

**दिवाकर :** दिवाकर !

**नरेश** : (कपाळावर हात मारून) काय सांगावं तुम्हाला दिवाकर! अहो, आतांची आपलीं नांवं काय?

**दिवाकर** : अरे हो! मी विसरलोंच होतों! एकाचं नांव कुशाबा आणि दुसऱ्याचं नांव खाशाबा!

**नरेश** : नीट लक्षांत ठेवा, दिवाकर! नाहीं तर करा माझ्या खऱ्या नांवाचा उच्चार म्हणजे सगळंच आटपलं! तुम्ही कुशाबा, मी खाशाबा—काय?

**दिवाकर** : तुम्ही कुशाबा, मी खाशाबा!

**नरेश** : छे! तुम्ही घोटाळा करणार नक्की! अहो, मी खाशाबा आणि तुम्ही कुशाबा—काय?

**दिवाकर** : मी खाशाबा तुम्ही कुशाबा!

**नरेश** : पुन्हां तेंच! तुमचं नांव कुशाबा! कसं लक्षांत येत नाहीं तुमच्या? काय नांव तुमचं?

**दिवाकर** : कुशाबा!

**नरेश** : हं आणि माझं?

**दिवाकर** : खाशाबा!

**नरेश** : बरोबर! अशी जरा हुशारी दाखवा कीं!

**दिवाकर** : मी युद्धांत असतांना एकदां अशी मजा झाली—

**नरेश** : दिवाकर, युद्धाच्या गोष्टी आतां पुरे! घोटाळा केलांत तर आपला व्यूह फसलाच म्हणून समजा.

**दिवाकर** : त्याची बिलकुल काळजी करूं नका. तुम्ही रचलेला व्यूह मी निश्चित यशस्वी करून दाखवीन. आम्हां लोकांना व्यूह रचतां येणार नाहीं, पण व्यूह यशस्वी करावा सैनिकांनींच. अहो, पहिल्या महायुद्धांत सुप्रसिद्ध हनेनबर्गचा व्यूह रचला मुत्सद्यांनी, पण तो यशस्वी रीतीनं पार पाडला कोणी! आमच्यासारख्या सैनिकांनींच ना? आफ्रिकेंत एकदां—

**नरेश :** पुरे हो दिवाकर! वाळवंटांत राहून राहून तुमच्या डोक्याचंहि वाळवंट झालं आहे का हो? अहो, मी सांगतों काय, अन् तुम्ही बोलतां काय? विनायक आतां ह्याच रस्त्यानं येईल. तो दृष्टीपथांत आला कीं, नाटक सुरूं करायचं. तुम्हाला सुशीलेशीं लग्न करायचं आहे ना?

**दिवाकर :** तें कां सांगायला पाहिजे बरं नरेश?

**नरेश :** मग डोक्यांतून आधी युद्ध, रणांगण, आफ्रिका, सैनिक ह्या सगळ्या गोष्टी काढून टाका बघूं– अगदी विचार करूं नका त्यांचा! अहो ही संधी हुकली कीं सुशीलेचं विनायकाशी लग्न लागलंच म्हणून समजा. जरा हुशार व्हा दिवाकर– जरा हुशार व्हा! मी सांगितलेल्या गोष्टी लक्षांत घ्या, म्हणजे अंतिम विजय तुमचाच आहे.

**दिवाकर :** बरोबर आहे! अंतिम विजय आपलाच आहे असं आपण नेहमी म्हटलं पाहिजे. मग शत्रूनं शेवटीं आपल्याला साफ लोळवलं तरी हरकत नाहीं! पण काहो एक गोष्ट आपण साफ विसरलोंच कीं!

**नरेश :** कुठली?

**दिवाकर :** माझं नांव कुशाबा– तुमचं नांव खाशाबा! पण विनायकाचं नांव काय ह्या नाटकांत!

**नरेश :** (चिडून) अहो. विनायकाच्या नांवाचा कुठे प्रश्न येतो इथं? काय बोलतां हो तुम्ही दिवाकर कांहीं तरी?

**दिवाकर :** नाहीं, पण मग विनायकाला कोणच्या नांवानं हांक मारायची आपण? म्हसोबा नांव कसं वाटतं तुम्हाला– आपली एक सूचना हं!

**नरेश :** तुम्ही तर माझा अगदी जीव खाल्लात बुवा! अहो, विनायकाला आपण बिलकूल ओळख द्यायची नाहीं आणि तो कोण आहे हें आपल्याला बिलकूल ठाऊक नाहीं असं दाखवायचं! एवढ्यासाठींच आपण हा वेष केला ना?

**दिवाकर :** पण विनायक कबूल होईल कां त्या गोष्टीला?

**नरेश :** पुन्हा तेंच! अहो. विनायकाच्या कबुलीचा प्रश्न इथें येतोच कुठें? आपण दोघं मारामारी करतो आहोत असं त्याला दाखवायचं. तो नक्की मारामारी सोडवायला येईल. तो मध्यें पडला कीं मारामारी बंद करायची. पुढचं सारं मी पाहून घेईन– तुम्ही अगदी चूप बसा! मूर्खांचा मित्र होण्यापेक्षां शहाण्याचा शत्रू होणं बरं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं!

**दिवाकर** : म्हणजे? मी नाहीं समजलों! ह्या नाटकांत विनायक आपला शत्रू समजायचा कीं मित्र?

**नरेश :** ( हताश होऊन ) तुम्हीं तुमच्या अपार बुद्धिवैभवानं मला अगदी थक्क करून टाकलंत बुवा!

**दिवाकर** : हो ना? हें अपार बुद्धिवैभव आमच्या सात पिढ्यांपासून चालत आलं आहे; पण जगाला कदर आहे कुठें? निदान कांहीं नाहीं तरी सुशीला मला मिळालीच पाहिजे. तिच्या प्राप्तीसाठीं तुमच्याशी खोटीच काय पण खरी मारामारी करायला सुद्धां मी तयार आहे.

**नरेश :** आतां किती रक्त आटवूं मी दिवाकर तुमच्यासाठीं? सुशीला तुम्हाला मिळावी म्हणूनच आपण हा सगळा व्यूह रचला आहे. मी सांगितलेलं लक्षांत ठेवा आणि त्याप्रमाणं वागा. म्हणजे शेवटीं सुशीला तुम्हालाच मिळेल.

**दिवाकर :** त्याची तुम्ही बिलकुल काळजी करूं नका. नरेश! पण का हो खरंच, एक आपण अगदी विसरलोंच कीं! सगळंच मुसळ केरांत!

**नरेश** : काय?

**दिवाकर** : अहो, ही मारामारी पहाण्यासाठीं सुशीलेला बोलवायचं राहूनच गेलं!

**नरेश :** नका बोलूं बुवा– अगदीं बोलूं नका तुम्ही आतां!

**दिवाकर :** बरोबर आहे तुमचं म्हणणं! बोलण्यापेक्षा क्रिया करून दाखवणंच अधिक श्रेयस्कर आहे!

**नरेश** : तयारींत रहा. विनायक आतां कोणच्याही क्षणी इथं येईल.

**दिवाकर** : येऊं द्या—तुम्ही बिलकूल घाबरूं नका! तो आलारे आला, कीं पकडतोंच त्याला!

**नरेश** : (खवळून) आतां साष्टांग नमस्कार घालूं कां तुम्हाला? मी सांगितलेल्या साध्या चार गोष्टी, त्यासुद्धा तुमच्या लक्षांत येऊं नयेत? मराठी भाषासुद्धा कळत नाहीं कीं काय तुम्हाला? फक्त मी सांगितलं तवढं करा—स्वतःचं डोकं अजिबात चालवूं नका! (घाईनें) तो बघा आला विनायक! हं करा सुरवात, चला आटपा! (नरेश आणि दिवाकर एकमेकांचे गळे पकडून आणि एकमेकांवर अपशब्दांचा भडिमार करीत मारामारीचा देखावा करतात. "काय हे—सोडा सोडा," "झाली पाहिजे" "काय मवाली मातले आहेत" असे निरनिराळे उद्गार काढीत लोक जमा होतात. इतक्यांत विनायक धावत प्रवेश करतो.)

**विनायक** : अहो, सोडा! सोडा! काय चालवलं आहे तुम्ही हें? (दोघांच्यामध्यें उभा राहतो.) एकदम बंद करा हा तमाशा—

**नरेश** : तुम्ही दूर व्हा! कुशाबाला ठार केल्याशिवाय मी आज राहत नाहीं!

**दिवाकर** : अरे खाश्या, तुझी काय टाप लागली आहे मला मारायाची! व्हा दूर तुम्ही—

**विनायक** : (ओरडून) बंद करा म्हणतों ना? एकदम बंद करा! (दिवाकर व नरेश मारामारी बंद करतात) मूर्खांनो, तुमचे हात इतके उन्मत्त झाले आहेत, तर ते दगडावर कां आपटून घेत नाहीं? म्हणजे दगड फोडायला लागणारा सरकाराचा खर्च तरी वाचेल! हमरस्त्यावर मारामारी करायला तुम्हाला लाज नाहीं वाटत?

**नरेश** : साहेब, या कुशाबानं माझा गळा दाबला!

**विनायक** : काय हो कुशाबा?

**दिवाकर :** या खाशाबानं माझी तंगडी ओढली !

**विनायक :** काय हो खाशाबा ?

**नरेश :** साहेब, हा मला ठार मारायला निघाला होता.

**विनायक :** कुशाबा, तुम्ही इतके महामूर्ख असाल असं मला वाटलं नव्हतं. तुमच्या तोडीचा महामूर्ख या जगांत मी एकच पाहिला आणि तो म्हणजे हा खाशाबा. गाढवांनो, माणसामाणसांत आज आपुलकी राहिली नाहीं हेंच तुम्ही सिद्ध करीत आहांत. माणसामाणसांत आपुलकी निर्माण करण्यासाठीं पुरुषांनीं भेटल्याबरोबर एकमेकांना कडकडून मिठी मारावी असं स्पष्ट मत बाबानं प्रदर्शित केलं आहे. पण हा बाबा म्हणजे बाबासाहेब नसून बाबाखान होय. आलं ना डोक्यांत ? नाहीं तर घोटाळा कराल ! आणि काहो, तुमचीं लग्नं झालेलीं आहेत कीं नाहीं अजून ? काय हो कुशाबा ?

**दिवाकर :** भले ! अहो, लग्नासाठीं तर ही सारी धडपड चालली आहे !

**विनायक :** म्हणजे ?

**नरेश :** ( दिवाकराकडे रागानें पाहतो ) तुम्हीं अगदीं लक्ष देऊं नका साहेब, त्याच्या बोलण्याकडे—तो असंच बडबडत असतो कांहींतरी—! आमचीं लग्नं होऊन फार दिवस झाले !

**विनायक :** तुम्ही फार ऐट करूं नका ! माझंसुद्धां लग्न ठरलं आहे. लग्नासाठीं आजच मी आठ दिवसांच्या रजेचा अर्ज टाकला आहे. अहाहा ! सुशीला माझीं पत्नी होणार—सुशीला माझी फुलासारखी काळजी घेणार ! काय सांगूं खाशाबा, माझी सुशी म्हणजे शुक्राची चांदणी आहे ! काय तिचं बोलणं, काय तिचं चालणं, काय तिचं वागणं !

**दिवाकर :** अहाहा ! काय बोललांत ! खरंच शुक्राची चांदणीच ती ! जन्माला यावं आणि तिच्याशी लग्नं करावं ! काय तिचं बोलणं, काय तिचं चालणं, काय—

**विनायक :** कोणाबद्दल बोलतां आहांत तुम्ही कुशाबा ?

**नरेश :** कुशाबा शुक्राच्या चांदणीबद्दल बोलताहेत ! कुशाबा, तोंड सांभाळून बोल ! साहेब, हा मनुष्य असाच वेडसर आहे ! म्हणून तर मी ह्याला चांगला चोपून काढत होतो !

**विनायक :** अरेरे ! किती वाईट गोष्ट करीत होतां तुम्ही खाशाबा ! वेड्यांना ममतेची गरज असते, माराची नव्हे ! कुशाबांना कांहीं कामधंदा आहे कीं नाहीं ?

**नरेश :** ह्याला कसला आहे कामधंदा ! पोळासारखा सुटला आहे गांवांत !

**विनायक :** किती निर्दय आहांत तुम्ही खाशाबा ! त्यांच्या बेकारीच्या दुःखावर आणखी डागण्या देतां ! कुशाबा, सुप्रसिद्ध चंद्रप्रकाश लाकूड वखारीचा मी व्यवस्थापक आहे ! उद्यापासून या वखारींतील मुख्य हमाल म्हणून मी तुमची नेमणूक केली आहे. समजलं ?

**दिवाकर :** ( ओरडून ) मी ? हमाल ? हरामखोरा–

( विनायकावर धावून जातो. नरेश त्याला आवरतो )

**विनायक :** अरे अरे ! जमदग्नीच दिसतो आहे हा कुशाबा म्हणजे ! ( दूर पाहून ) अरे बापरे ! पोलीस आपल्याकडेच येत आहेत. पळा कुशाबा, खाशाबा, पळा आणि पुन्हां भांडूं नका. पळा पळा लवकर– मी इकडून जातों– तुम्ही तिकडे पळा !

**नरेश :** तुम्ही पळा साहेब ! आम्ही निघालोंच !

( विनायक आणि इतर लोक निघून जातात. फौजदार आणि दोन पोलीस प्रवेश करतात. )

**फौजदार :** ( दरडावून ) काय गडबड आहे ही ? कोण मारामारी करीत होतं इथं ? तुम्ही ?

**नरेश :** ( बोट दाखवून ) साहेब तो इसम पहा– पळतो आहे. आम्ही गरीब लोक– आम्हांला मारीत होता. फार मारलं साहेब आम्हांला. आणि त्याला तुमची भीति दाखवली तर म्हणाला–

**फौजदार** : काय म्हणाला ?

**नरेश** : म्हणाला, कीं असे छपन्न फौजदार पाहिले आहेत.

**फौजदार** : असं काय ? ( पोलीसांना ) चला रे ! त्या गुंडाचा चेहेरा मी पाहिलेला आहे. गांवाचं स्वास्थ्य बिघडविणाऱ्या अशा गुंडांचा बंदोबस्त केलाच पाहिजे. चला एकदम. ( जातात )

**नरेश** : चला, दिवाकर, आपलं नाटक संपलं !

( जातात. पडदा )

## प्रवेश चवथा

[ बाबासाहेबांच्या घरामधील दिवाणखाना. उषा, निशा आणि सुशीला बसलेल्या आहेत. ]

**उषा** : ( आळोखे पिळोखे देत ) बसून बसून अगदीं कंटाळा आला बाई! पण कुठं बाहेर फिरायला जावं तर तेंहि आज शक्य नाहीं. बाबांनीं आज आपल्याला तिघींनाहि घरीं थांबायला सांगितलं आहे.

**निशा** : उषे, बाबांनीं आपल्याला आज घरीं थांबायला सांगितलं तें कां, आहे ठाऊक?

**उषा** : मला नाहीं बाई ठाऊक! कां!

**निशा** : अग, आज आमच्या सुशीलाबाईंचं स्वयंवर आहे. आपल्याला कोणचा वर पसंत आहे हें सुशी बाबांना सांगणार आहे आज. बाई बाई, एवढी साधी बाब, पण किती वेळ घेते आहे सुशी त्यासाठीं!

**उषा** : सुशे, तुझा निर्णय निदान आम्हांला तरी कळूं दे कीं आधी! सांग बघूं– विनायक कीं दिवाकर? ( सुशीला हंसते )

**निशा** : आणि कां ग, काल सकाळीं कोणाची चोरून भेट घ्यायला गेली होतीस बाहेर तूं?

**सुशीला** : इश्श! कसली भेट अन् कसलं काय! मी आपली फिरायला गेलें होतें सकाळीं!

**उषा** : फिरायला? अग लबाडे! सकाळचंफिरणं कधींपासून सुरू केलंस तूं?

**सुशीला** : अग, दूर जाऊन उगवता सूर्य बघावा म्हणून मी मुद्दाम गेलें होतें काल सकाळीं फिरायला! खरंच, उगवत्या सूर्याची शोभा किती

मनोरम दिसते, नाहीं? विश्वांतलं सारं सौंदर्य, त्या सौंदर्यापुढं फिक्कं वाटतं, कवडीमोल वाटतं.

**निशा** : तूं सूर्य बघायला गेली होतीस हें आम्हांला माहीत आहे ग! ह्या सूर्याचं नांव काय आहे, एवढंच आम्ही विचारतों! सांग काय नांव तें!

**सुशीला** : चल, तुझं आपलं कांहीं तरीच!

**निशा** : बरं बाई, नांव घ्यायचं नसेल तर नको घेऊंस. पण एवढंच सांग कीं, हा सूर्य चंद्रप्रकाश लाकूड वखारीचा व्यवस्थापक आहे कां पांजर-पोळांतल्या गायींचा सरसेनापती आहे?

**सुशीला** : (हंसून) चल, चहाटळ कुठली!

**उषा** : निशे, अग ही अगदी पक्की आहे. मनांतलं कांहीं सांगायची नाहीं कुणाला. पण सांगितलं नाहीं, तरी कळल्याखेरीज थोडंच राहणार आहे? म्हटलं, आम्हाला समजलं आहे कोणचा वर पसंत केला आहेस तूं तें! कोणचा सांगूं? सांगूं?

**सुशीला** : (हंसून) सांग बघूं!

**निशा** : अगबाई! बाबा इकडेच आले!

(बाबासाहेब आणि अशोक प्रवेश करतात)

**बाबासाहेब** : या, अशोक, बसा! (दोघं बसतात) मी तुम्हाला आज तातडीनं इथं कां बोलावलं, आहे माहीत? आज सुशी आपला निर्णय मला सांगणार आहे. आज कांहीं झालं तरी निर्णय कळायलाच हवा असं मीं तिला सांगितलं आहे. कारण येत्या सोमवारचा मुहूर्त मी अगदी निश्चित केला आहे. नरेश, दिवाकर, विनायक यांनाही मी बोलावणं धाडलं आहे. मी सगळयांना एवढ्यासाठीं बोलावलं कीं सुशीचा निर्णय तिच्या तोंडूनच सगळयांना ऐकायला मिळावा. उषेला आणि निशेला आपले साथीदार निवडण्याची जशी संधी मिळाली तशी सुशीलाही मिळाली पाहिजे आणि सुशीचा निर्णय तिचा स्वतःचा निर्णय आहे हें सगळयांना कळायला हवं.

( हंसून ) कोणी असं म्हणायला नको कीं चुलत्यानं पुतणीवर दडपण आणलं! ( नरेश, दिवाकर, विनायक आणि अण्णा प्रवेश करतात ) या मंडळी या— शंभर वर्षं आयुष्य आहे सगळयांना. अरे रामा दोन-चार खुर्च्या घे बरं इकडे! ( गडी खुर्च्या आणतो ) बसा, ( सगळे बसतात, अण्णांकडे पाहून ) अशोक, यांची ओळख—

**अशोक** : हे अण्णासाहेब कुलकर्णी, विनायकाचे हितचिंतक आहेत हे.

**विनायक** : अगदी वडिलांच्या ठिकाणीं आहेत मला हे!

**बाबासाहेब** : असं कां? ( बाबासाहेब व अण्णा परस्परांना नमस्कार करतात. )

**विनायक** : आणि बाबासाहेब, ह्यांचा पायगुणही फार चांगला आहे! हें भेटल्यापासून—

**अशोक** : विनायक!

**बाबासाहेब** : ठीक, तुम्ही आलांत हेंही फार बरं झालं. येत्या सोमवारीं ह्या तिन्ही मुलींचे विवाह उरकून टाकण्याचं मी निश्चित केलं आहे. माझ्या मनांत किती खळबळ उडाली आहे म्हणून सांगूं! ह्या तीन पांखरांनीं माझं घर कसं सदैव गजबजलेलं असायचं. आतां ही तिन्ही पांखरं एकदम उडून जाणार! हें घर आतां मला खायला उठेल!

**उषा** :
**निशा** :
**सुशीला** : } बाबा!

**बाबासाहेब** : वेड्यांनो, तुम्ही बिल्कूल वाईट वाटून घेऊं नका. जें प्रत्येक वधुपित्याच्या नशिबांत लिहिलं आहे त्याला मी तरी कसा अपवाद ठरणार? आईविना असलेल्या ह्या तिघी मुलींना मी फार माया लावली असं लोक म्हणतात. पण त्यांत फारसा अर्थ नाहीं. महत्वाची गोष्ट आहे ती ही कीं, ह्या तीन मुलींनीं आजपर्यंत माझ्यावर सतत, अखंडित प्रेमाची धार धरली.

लाडक्यांनो, तुमचं माझ्यावरचं ऋण कोणाला दिसण्यासारखं नसलं तरी तें फार मोठं आहे.

**अशोक** : बाबासाहेब, उषा काय किंवा निशा काय, लग्नं झालं तरी दूर थोडीच जाणार आहे? त्या परक्यांच्या घरांत जात आहेत हेंच खरं नाहीं. आपल्यांत परकेपणा कधीं नव्हता आणि पुढें कधींही राहणार नाहीं,

**नरेश** : एवढंच नव्हे तर, ह्या विवाहांमुळें आपले निकट संबंध अधिकच घनिष्ट होणार आहेत!

**बाबासाहेब** : खरं आहे तुमचं म्हणणं! मला मोठं समाधान वाटतं तें ह्यामुळेंच होय. अशोक-उषा आणि नरेश-निशा यांचे शास्त्रोक्त विवाह येत्या सोमवारीं व्हायचे ते होतीलच. पण हे विवाह निश्चित झाले, त्याच वेळीं मी- माझ्या हातानं- त्यांचे हात एकमेकाच्या हातांत दिले होते.

**अशोक** : आतां प्रश्न राहिला आहे फक्त सुशीलेच्या बाबतींत!

**बाबासाहेब** : होय. आणि तोच प्रश्न इथं आतां सोडवायचा आहे. सुशे बेटा! तुम्हा तिघींचीं लग्नं येत्या सोमवारीं करायची आहेत. अधिक काळ थांबणं आतां इष्ट नाहीं. तूं सगळा विचार केला असशीलच. विचार करायला तुला वेळही पुष्कळ मिळाला. तूं समजूतदार आहेस, हुशार आहेस- स्वतःचं हित कळण्याइतकी हुशार आहेस. दिवाकर आणि विनायक हे दोघंही हुशार आहेत, प्रेमळ आहेत. अखेरचा निर्णय तूंच घ्यायचा असून ती वेळ आतां आली आहे. सांग बेटा काय तें!

**नरेश** : सुशीलाताई, लग्नाच्या बाबतींत कोणी कोणावर दडपण आणूं नये हें योग्यच आहे. पण एखादी सूचना करणं म्हणजे दडपण आणणं असं खात्रीनं कोणीं म्हणणार नाहीं. बाबासाहेब म्हणतात त्याप्रमाणें, हीं दोन्ही स्थळं चांगलीं आहेत यांत शंका नाहीं. पण त्यांतही तूं दिवाकरांचा विचार केलास तर अधिक बरं असं वाटतं. दिवाकर प्रेमळ आहेत, हुशार आहेत आणि मुख्य म्हणजे त्यांची आर्थिक स्थिति फारच चांगली आहे. कारण

कितिहि नाहीं म्हटलं तरी आर्थिक सुस्थिति हीच सर्वांत महत्वाची बाब आहे हें मला वाटतं. कुणीही– अशोक सुद्धां नाकबूल करणार नाहीं.

**अशोक :** हें मी नाकबूल करीत नाहीं. पण नोकरी मिळाल्यामुळं विनायकाची आर्थिक स्थितीही वाईट राहिली नाहीं एवढंच माझं म्हणणं. पण ह्या बाबतींत मी कांहींच बोलूं इच्छीत नाहीं. हा निर्णय स्वतः सुशीलेनं घ्यावा हेंच योग्य.

**बाबासाहेब :** मी तरी हेंच म्हणतों !

**उषा :** शिवाय, सुशीला दोघांच्याही आर्थिक परिस्थितीची पूर्ण कल्पना आहे आणि दोघांशींही तिचा थोडाफार परिचय झाला आहे.

**विनायक :** बरोबर ! काल बागेमध्यें—

**अशोक :** विनायक !

**दिवाकर :** बागेमध्यें ? (हंसून) अहो, बाग नव्हता तो, रस्ता होता महाराज ! हमरस्त्यावर आपण—

**नरेश :** दिवाकर !

**निशा :** बोल बाई लवकर सुशे !

**अशोक :** निदान निशेसाठीं तरी बोल सुशे ! तिचं बिचारीचं लग्न अडून राहिलं आहे त्यामुळं !

**निशा :** इश्श ! त्यासाठीं नाहीं म्हणत हं मी !

**उषा :** नाहीं कसं ? तेवढ्यासाठीं म्हणते आहेस तूं !

**निशा :** तुझ्या मनांतले विचार माझ्यावर नको लादूंस ! पण तुझ्या सोयी-साठीं मी तेंही म्हणायला तयार आहे. मग तर झालं ? सुशे, बोल बाई— माझं लग्न अडून राहिलं आहे—!

**अण्णा :** भारीच लाजरी दिसते तुमची सुशीला बुवा !

**बाबासाहेब :** हं, सांग लवकर काय तें सुशे ! किती वेळ लावतेस !

**सुशीला :** (हळूंच संथपणें) बाबा, मला विनायकांशीं लग्न करायचं आहे.

**विनायक** : ( एकदम उभा राहतो ) सुशीला—सुशे, ह्या क्षणापासून मी त्रैलोक्याचा राजा झालों आणि तूं त्रैलोक्याची राणी झालीस. आणि बाबा-साहेब, तुम्हीसुद्धां त्रैलोक्याचे सासरे झालांत बरं का ! सुशे, सुशीला किती चांगली आहेस तूं !

**सुशीला** : पुरे गडे ! चारचौघांत असं बोलणं बरं कां ?

**बाबासाहेब** : सुशीला, तूं हा निर्णय पूर्णपणें विचार करून घेतला आहेस ना ?

**सुशीला** : हो बाबा ! त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाशींही लग्न करण्याची कल्पना माझ्या मनाला शिवत नाहीं.

**दिवाकर** : ( नरेशला ) का हो, मग कालचा आपला आटापिटा सगळा फुकट गेला कीं काय ? ( सर्व दिवाकराकडे कुतूहलानं पहातात )

**नरेश** : दिवाकर !

**अण्णा** : कालचा कसला आटापिटा ?

**नरेश** : हो ! काल मी आणि दिवाकरांनीं खूप चर्चा केली. मी दिवाकरांना सांगत होतों कीं सुशीलाताई तुमच्याशींच लग्न करणार आणि ते मात्र सारखा संशय प्रगट करीत होते. चार तास चर्चा करून आमच्या जिवाचा खूप आटापिटा करून घेतला आम्हीं ! दिवाकर, कालचा विषय इथं काढायचा नाहीं हें मी तुम्हाला बजावून सांगितलं होतं, पण तें तुमच्या लक्षांत राहिलेलं दिसत नाहीं. निदान यापुढें तरी तें नीट लक्षांत ठेवा !

**बाबासाहेब** : ठीक ! आतां सुरळीत झालं. येत्या सोमवारचा मुहुर्त धरायला आतां कसलीहि हरकत उरली नाहीं. माझ्या तिन्ही मुलींना मनपसंत स्थळं मिळालीं. माझ्या पाखरांना उबदार घरटीं मिळालीं. विनायक, सुशीला, तुमचा शास्त्रोक्त विवाह सोमवारीं व्हायचा तो होईलच. पण मी आतां—माझ्या हातानं—तुमचं मीलन घडवून आणतों ( विनायक आणि सुशीला यांचे हात हातांत घेऊन ) विनायक, ही माझी लाडकी पुतणी—

( एक इसम हातांत पत्र घेऊन प्रवेश करतो )

**इसम** : विनायक महादेव देशपांडे आहेत का ?

( बाबासाहेब दोघांचे हात सोडून देतात. विनायक पुढें येतो )

**विनायक** : हो ! मीच विनायक महादेव देशपांडे.

**इसम** : तुमचं हें पत्र आहे.

**विनायक** : ( आश्चर्यानं ) माझं पत्र ?

**इसम** : हो तुमचंच—हें घ्या ! ( पत्र विनायकाच्या हातांत देऊन जातो )

**विनायक** : ( पत्र वरखालीं करीत ) कोणाचं पत्र बुवा ? नाहींतरी वखारीचा व्यवस्थापक झाल्यापासून माझा पत्रव्यवहार फार वाढला आहे. कोणाच्या आर्डरी असतात, कुणाच्या ओल्या लाकडाबद्दल तक्रारी असतात—एक ना हजार गोष्टी ! आतां नेहमी कोरडीं लाकडं तरी आणायचीं कुठून !

**नरेश** : पत्र फोडायचं राहिलं !

**विनायक** : ( पत्र फोडतांना ) पत्र फोडतों हो ! कामाचा व्याप फार वाढत चालला ! ( पत्र उलगडतांना ) कोण चिरंजीव आहेत हे ? ( पत्र वाचूं लागतो आणि वाचल्यानंतर अत्यंत कावराबावरा होतो. पत्र हातांतून गळून पडतें ) अरेरे ! काय झालं हें !

**अण्णा** :<br>**अशोक** :<br>**सुशीला** : } काय झालं ? काय झालं ?

**नरेश** : ( पत्र उचलतो आणि वाचतो ) अरेरे ! फार वाईट बातमी आहे ! विनायकांची नोकरी गेली !

**बाबासाहेब** : ( ओरडून ) काय नोकरी गेली ?

**नरेश** : हो ! नोकरी गेली ! चंद्रप्रकाश लाकूड वखारीच्या मालकाचं पत्र आहे. तो लिहितो—नोकरीवर रुजू होऊन कुठे दोन दिवस झाले नाहींत, तोंच लग्नाच्या निमित्तानं तुम्ही आठ दिवसांची रजा घेतां—असं कामचुकार

व्यवस्थापक आम्हांला नकोत ! आजपासून तुम्हाला नोकरीवरून कमी केलं आहे. ( पत्र खालीं टाकून देतो ) फार वाईट झालं विनायक हें !

**विनायक** : ह्या लाकूडवाल्यानं ऐन वेळेवर माझ्या डोक्यांत लाकूड घातलं !

**बाबासाहेब** : ( निश्चयी स्वरांत ) नोकरी नसलेल्या माणसाला मी माझी सुशी कधींही देणार नाहीं. विनायक, क्षमा करा—पण माझी मघाची संमती रद्द समजा.

**सुशीला** : बाबा— !

**बाबासाहेब** : वेडे, तुझं हित तुला कळत नसलं तरी मला तें बघायला पाहिजे. विनायकांपेक्षा तूं दिवाकरांचाच विचार करणं आतां योग्य होईल. दिवाकरांना नोकरी आहे, शिवाय ते मोठे जमीनदार आहेत.

**दिवाकर** : बाबासाहेब, तुमचे आभार मी कोणत्या शब्दांत मानूं ? सुशीले-साठीं मी माझी बंदूकसुद्धा काल शेतामध्यें कायमची पुरून टाकली आहे !

**सुशीला** : ( आवेगानें ) बाबा, त्यांना दुसरी नोकरी मिळेल—नक्की मिळेल !

**अण्णा** : बाबासाहेब, केवळ ह्या क्षणाला विनायकाला नोकरी नाहीं, म्हणून ह्या दोन प्रेमी जिवांची ताटातूट होऊं नये असं मला वाटतं. लग्न सोमवारीं आहे. त्याच्या आंत विनायकाला दुसरी नोकरी लावून देण्याचं मी अभि-वचन देतों.

**अशोक** : बाबासाहेब, अण्णांच्या ह्या अभिवचनांत मी सुद्धा भागीदार आहे असं समजा. विवाहाचा दिवस उजाडण्यापूर्वी विनायकाला नोकरी लावून देण्याची जबाबदारी आम्ही स्वीकारतों.

**सुशीला** : बाबा, त्यांना दुसरी नोकरी नक्की मिळेल—नक्की मिळेल. माझं एवढं ऐका—एवढी भिक्षा घाला मला !

**बाबासाहेब** : वेडी आहेस ! ( अशोक आणि अण्णांकडे दृष्टि वळवून ) मला विचाराल तर सुशीसाठीं मी दिवाकरांनाच पसंत करीन. हातच्याला सोडून पळत्याच्या पाठीमागें लागण्यांत काय फायदा ? पण सुशीचा आग्रह

आहे आणि तुम्हीहि लग्नाच्या आंत विनायकांना नोकरी मिळवून देण्याचं अभिवचन देतां, म्हणून मी तुमचं म्हणणं मान्य करतों.

**नरेश :** पण बाबासाहेब, यांत जरा धोका आहे असं मला वाटतें! उद्या विनायकांना नोकरी न मिळाली तर ?

**बाबासाहेब :** नरेश, तुमचं म्हणणं मला पटत नाहीं असं नाहीं. पण सुशीचाच आग्रह आहे तर होऊं दे तिच्या मनासारखं!

**सुशीला :** ( हर्षानं ) बाबा! बाबा! किती चांगले आहेत माझे बाबा!

**बाबासाहेब :** ठीक आहे तर मी आज. माझ्या हातानं—विनायक आणि सुशीला यांचं मीलन करून देतो. ( विनायक आणि सुशीला यांचे हात हातांत घेतात ) विनायक, ही सुशी, माझी लाडकी पुतणी—

( इतक्यांत फौजदार आणि दोन पोलिस प्रवेश करतात. सर्व बावरतात. बाबासाहेब सुशीला-विनायकाचे हात सोडून देतात. )

**फौजदार :** ( विनायकाजवळ जाऊन ) विनायक महादेव देशपांडे ?

**विनायक :** ( बावरून ) मी—मी विनायक महादेव देशपांडे!

**फौजदार :** तुम्हाला आम्ही अटक करीत आहोंत!

**विनायक :** मला ?......अटक ?...कशासाठीं ?

**बाबासाहेब :** हा काय प्रकार आहे आणखी ?

**सुशीला :** बाबा! ( बाबासाहेबांना बिलगते )

**फौजदार :** काल हमरस्त्यावर तुम्ही मारामारी केलींत आणि आम्ही दिसल्याबरोबर पळून गेलांत. गांवाच्या स्वास्थ्यासाठीं तुमच्यासारख्या गुंडांना तुरुगांत डांबलंच पाहिजे. ( पोलिसांना ) पकडा यांना आणि चला घेऊन!

**विनायक :** ( काकुळतीस येऊन ) अहो, मी मारामारी केली नाहीं—मी फक्त मारामारी सोडवली! मी गुंड नाहीं, गुंड नाहीं—हा माझ्यावर वृथा आळ आहे!

**फौजदार :** जी काय बडबड करायची, ती कोर्टांत करा; माझ्यापुढं नको!

**नरेश** : परमेश्वराची कृपा म्हणून सुशीलाताईंचं विनायकांशीं लग्न होण्या-आधींच ही गोष्ट उघडकीस आली! नाहींतर किती भयंकर प्रसंग आला असता!

**विनायक** : (ओरडून) खोटं आहे—खोटं आहे हें! बाबासाहेब, मी कशी खात्री पटवूं तुमची? मी मारामारी केली नाहीं, फक्त सोडवली! मी गुंड नाहीं, मी मनानं सुद्धां कुणाचं वाईट चिंतिलं नाहीं. मी निर्दोष आहें—अगदी निर्दोष आहें! अण्णा, मी निर्दोष आहे!

**अण्णा** : फौजदारसाहेब, तुमची कांहीं चूक तर होत नाहीं ना?

**अशोक** : चोर सुटून संन्याशी फाशीला जाण्यासारखा तर हा प्रकार नाहीं ना?

**फौजदार** : मारामारी करून पळून जातांना ह्या गृहस्थाला मी प्रत्यक्ष पाहिलं आहे. दोन गरीब माणसांना ह्यानं बेदम चोपलं आणि आतां कांगावा पहा कसा करतो आहे तो. ह्या गुंड लोकांचं हें नेहमीचंच आहे! चला यांना घेऊन! तुरुंगाची हवा खाल्ली कीं चटकन येतील ठिकाणावर!

**बाबासाहेब** : विनायकांचा विचारसुद्धां आतां सुशे, तूं मनातून काढून टाक. तुझ्या मनासारखं झालं असतं तर बेटा, मलासुद्धां फार आनंद झाला असता. पण ह्या जगांत सगळ्याच गोष्टी मनासारख्या होत नाहींत. त्या तशा व्हाव्यात अशी अपेक्षाही करणं चूक आहे. आणि जें मनासारखं असतं तेंच सदैव हितप्रद असतं असंही नाहीं. बेटा, झालं तें सारं विसरून जा. तूं दिवाकरांशीं लग्न करणं हेंच सर्व दृष्टींनी हितावह आहे. तोंच तुझ्या सुखाचा मार्ग आहे.

**दिवाकर** : (हर्षानं) नरेश, मित्रा, तुझे आभार मी कसे मानूं?

**विनायक** : मी निर्दोष आहें! मी निर्दोष आहें! मी कधींही मारामारी केली नाहीं! मी कुणाची शपथ घेऊन हें सांगूं? दुर्दैवानं, ज्यांची शपथ घेऊन खात्री पटवावी अशी जवळचीं माणसंसुद्धां मला कोणी नाहींत. कुणाची—कुणाची शपथ घेऊं मी? माझ्या स्वर्गस्थ आईबापांची शपथ घेऊन सांगतों, कीं मी निरपराधी आहें! मी खरंच मारामारी केली नाहीं, खरंच केली नाहीं. कसं सांगूं कसं पटवूं तुम्हाला!

**फौजदार** : कांहीं सांगूं नका आणि पटवूं नका. चला रे यांना घेऊन. आपल्याला थांबायाला वेळ नाहीं.

**बाबासाहेब** : दिवाकर, या तुम्ही असे या. सुशीचा हात मला माझ्या हातानं तुमच्या हातांत देऊं द्या. ( दिवाकर जवळ येतो ) ह्या मंगलप्रसंगीं विनायकांना अटक व्हावी हें दुर्दैव आहे. पण जें झालं, त्याचा शोक करण्यांत आतां अर्थ नाहीं. विधिघटना मनुष्याला टाळतां येत नाहीं हेंच खरं !

**फौजदार** : चला लवकर. आतां यापुढें एक क्षणहि थांबायला मला वेळ नाहीं!

**विनायक** : थोडे थांबा, मी तुमचा फार वेळ घेणार नाहीं. जिथं दैवच माझ्यावर उलटलं तिथं कुणालाच बोल लावण्यांत अर्थ नाहीं. हो ! आजची ही मंगल वेळ आहे—सुशीलेच्या करग्रहणाची पवित्र घटका आहे. अशा मंगलप्रसंगीं स्वतःच्या दुःखाचं प्रदर्शन करायला आतां जागा नाहीं. अशोक, नरेश, दिवाकर तुम्ही आतां चतुर्भुज होत आहांत. निराळ्या अर्थानं कां होईना, मीहि चतुर्भुज झालों आहे ! मी सुखी आहें—खरंच मी सुखी आहे. अण्णा, अशोक, तुम्ही बिलकूल वाईट वाटून घेऊं नका. माझ्याकरतां कांहींही करायचं तुम्ही शिल्लक ठेवलं नाहींत. पण माझ्यासारख्या दुर्दैवी माणसाचा तुम्हीं पाठपुरावा करून करून तरी किती करणार ? ( सुशीलेकडे पाहून ) तूं—तूं रडतेस ? वेडे, तुझ्या अमोल अश्रूंची दौलत ह्या अभाग्यासाठीं सांडूं नकोस. ही मंगल वेळ आहे—माझा विचारसुद्धा करूं नकोस तूं ह्यावेळीं. माझं अमंगल अस्तित्व विसरून जा—विसरून जा ! तूं दाखवलेल्या आपुल-कीची स्मृति मला दीपस्तंभाप्रमाणं सदैव धीर देत राहील, दूर लुकलुकणाऱ्या तारकेप्रमाणं सदैव दिलासा देत राहील. आज सगळे सुखी आहेत—मीसुद्धा सुखी आहें ! मला फक्त एकाच गोष्टीचं वाईट वाटतं. ह्या मंगल प्रसंगाचं मांगल्य माझ्यामुळं, माझ्यामुळं कलुषित झालं. त्याबद्दल उदार होऊन तुम्ही सारे मला क्षमा करा ! ( नमस्कार करतो ) चला आतां ! ( जाऊं लागतो आणि पुन्हां धांवतो ) दिवाकर, क्षमा करा, तुमचं अभिनंदन करायचं राहून गेलं. आपण दोघं प्रतिस्पर्धी होतों—पण ह्या मंगलप्रसंगीं त्या वैराचा उच्चार-

सुद्धा नको ! ह्या मांगल्यानं तें वैरहि धुऊन निघाळं. अमूल्य दौलतीचे शेवटीं तुम्ही स्वामी झालांत याबद्दल मी तुमचं अभिनंदन करतों !

**दिवाकर :** माझं अभिनंदन करण्यापेक्षां सगळयांनीं नरेशांचचं अभिनंदन करायला हवं. कारण काल नरेशांनीं व्यूह रचला नसतां तर ही आनंदाचा वेळ कशी आली असती ?

**अण्णा :** व्यूह? कसला व्यूह?

**नरेश :** ( कावराबावरा होऊन ) दिवाकर !

**दिवाकर :** नरेश, तुम्हीं मला एवढी मदत केलीत, त्यामुळं तर हा आनंदाचा दिवस उजाडला. अशा वेळीं मी गप्प बसूं ? छे, छे, मी इतका कृतघ्न नाहीं !

**नरेश :** दिवाकर !

**दिवाकर :** आतां नाहीं मी थांबायचा नरेश ! खरं म्हणजे आज हा आनंदाचा दिवस उगवला याचं सारं श्रेय नरेशांनाच द्यायला हवं ! नरेश होते म्हणून तर विनायकांना अटक होऊन सुशीलेचं आणि माझं लग्न शक्य झालं !
( सर्व चकीत होऊन नरेश आणि दिवाकर यांच्याकडे आळीपाळीनें पाहतात. फौजदार मागें फिरतो आणि पोलीस विनायकापासून दूर होतात. )

**अशोक :** म्हणजे काय ?

**नरेश :** ( हताश होऊन ) दिवाकर, काय बोलतां आहांत तुम्हीं कांहीं तरी !

**दिवाकर :** आतां नाहीं मी थांबायचा ! अहो, काल आम्ही एक व्यूह रचला. मी झालों कुशाबा आणि नरेश झाले खाशाबा. आम्ही खोटी मारामारी केली आणि विनायक आले मारामारी सोडवायला. फौजदारांना दिलं आम्हीं विनायकांच्या मागे सोडून ! नाहीं कां हो नरेश ? हें नरेशांनीं केलं नसतं तर मला सुशीला कशी मिळाली असती ? काय सुशीला, खरं कीं नाहीं ?

**फौजदार :** अरेरे ! ह्याचा अर्थ मी ह्या निरपराधी गृहस्थांना उगीचच पकडलं असा आहे. माफ करा मला ! ह्या एकंदरीत निराळयाच भानगडी

दिसतात. आपल्याला ह्यांत पडायचं कांहींच कारण नाहीं. चला रे !

( फौजदार आणि पोलीस जातात )

**निशा** : काय, काय केलंत हें तुम्ही नरेश ?

**नरेश** : ( मान खाली घालतो ) तुम्ही सगळे मला क्षमा करा ! माझ्या हांतून अतिशय निंद्य वर्तन झालं ! विनायक, तुमची क्षमा तरी मी कोणच्या तोंडानं मागूं ?

**विनायक** : माझी कसली क्षमा नरेश ? तुम्हाला माझ्यामुळें हा जो मन-स्ताप झाला, त्याबद्दल मीच तुमची क्षमा मागतों !

( इतक्यांत एक अस्सल मराठेशाही पोशाख केलेला इसम प्रवेश करतो. )

**बाबासाहेब** : या ! कोण आपण ?

**हंबीरराव** : मी हंबीरराव, चंद्रप्रकाश लाकूड वखारीचा मालक ! आमच्या व्यवस्थापकांचं लग्न ठरतं आहे असं ऐकलं म्हणून इथं आलों !

**अण्णा** : हंबीरराव, आमच्या विनायकाला तुम्ही एकाएकी नोकरीवरून काढलं हें बरं कां ? लग्नासाठीं त्यांनीं रजा घेतली, हा काय त्यांचा अपराध झाला ?

**हंबीरराव** : म्हणजे ? काय बोलतां आहांत अण्णा तुम्ही ? कोण म्हणतं विनायकांना नोकरीवरून काढलं ?

**अण्णा** : म्हणजे ? हा प्रकार आहे तरी काय ? ( पत्र उचलतो आणि हंबीररावांच्या हातांत देतो ) हें बघा तुमचं पत्र !

**हंबीरराव** : ( पत्र वाचतो. ओरडून ) अहो, ही शुद्ध बनवाबनवी आहे ! माझं हें पत्रंच नव्हे !

**नरेश** : त्याबद्दलही तुम्ही सगळयांनीं मला क्षमा केली पाहिजे !

( कांहीं वेळ स्तब्धता )

**निशा** : ( हंसून ) नरेश, आतां खरंच वाईट वाटून घेऊं नका ! झालं तें झालं ! प्रत्येकाच्या हांतून चुका होतात !

**अशोक :** नरेश, दिवाकरांसाठीं तूं जशा कारवाया केल्यास, तशा मी सुद्धां विनायकांसाठीं केल्या नाहींत, असं नाहीं. त्यांत एवढं वाईट वाटून घ्यायचं खरोखरच कांहीं कारण नाहीं.

**विनायक :** नरेश, तुम्ही असे खिन्न राहिलांत तर सगळ्यांचा विरस होईल!

**नरेश :** माझा अपराध फार मोठा आहे, पण तो अपराध पोटांत घेणारं तुम्हां सर्वांचं औदार्य त्याहूनहि मोठं आहे! तुम्ही सर्वांनीं मला सावरून घेतलंत– मला क्षमा केलींत! अपूर्व आनंदानं, कृतज्ञतेनं माझं हृदय भरून आलं आहे! मग खिन्नपणाचं आतां कारण तरी काय?

**विनायक :** खरंच, खिन्नपणाचं आतां कारण तरी काय? जगांतली सारी खिन्नता, सारीं दुःखं ह्या क्षणाला नाहींशी झालीं आहेत. कारण सुशीला आतां माझी झाली– माझी झाली! खरं ना सुशीला हें?

**सुशीला :** हो, मी तुमचीच झालें, तुमचीच झालें विनायक! मी तुमचीच होतें, तुमचीच राहीन! आकाशांतील अभ्रं आतां विलयाला गेलीं! आकाश निरभ्रं झालं! मंगल सौख्यांची पखरण करीत निरभ्र आकाशांत उगवता सूर्य आतां हंसूं लागला! आतां आपल्या लग्नाला कसलीहि आडकाठी उरली नाहीं! खरं ना बाबा हें? सांगा ना– खरं ना हें? खरं ना?

**बाबासाहेब :** खरं आहे बेटा! तुमच्या मीलनाला आतां कसलीहि आडकाठी उरली नाहीं. ( विनायक आणि सुशीला यांचे हात हातांत घेतात ) विनायक, हें माझं रत्न मी आतां तुमच्या स्वाधीन करतों. ( त्यांचे हात एकमेकांच्या हातांत देतात ) पांखरांनो! सुखानं नांदा!

**विनायक :** ( आनंदातिशयानं ) सुशीला–!

**सुशीला :** अं हं! सुशीला नाहीं मी आतां! मी आतां वीणा आहे– विनायकांची वीणा आहे! उगवत्या सूर्याचं स्वागत करणारी वीणा आहे मी!